# रणशिंग

वि. दा. सावरकर



प्रकाशन क्रमांक ८५



ग. पां. परचुरे प्रकाशन मन्दिर, मुम्बअी ४

मूल्य अडीच रुपये

प्रकाशक :
**ग. पां. परचुरे,**
ग. पां. परचुरे प्रकाशन-मन्दिर,
गोरेगांवकर चाळ क्र. २,
गिरगांव, मुंबअी ४





आवृत्ति पहिली
आक्टोबर १९५२



मुद्रक :
**श्री. ना. राजगुरु,**
राजगुरु मुद्रणालय,
४०५ नारायण पेठ,
पुणे २.

# प्रकाशकाचे दोन शब्द



प्रासंगिक निमित्तानें हिंदु अितिहासावर घेतल्या गेलेल्या खोट्या आक्षेपांना निरसण्यासाठीं वेळोवेळीं अितिहासाच्या आधारानें जे अनेक मणसणीत लेख स्वा. वीर सावरकरांनीं लिहिले त्यांतून कांहीं चिरंतन महत्वाच्या लेखांचा हा संग्रह आम्ही प्रसिद्ध करीत आहोंत. ह्या लेखांतील स्फूर्ति प्रत्येक जातिवंत हिंदूचें रक्त, अेखाद्या रणशृंगाच्या निनादासरशीं सळसळावें, तसें आत्मविश्वासाच्या वीरवृत्तीनें सळसळविल्या-वांचून रहाणार नाहीं. यास्तवच या संग्रहास आम्हीं 'रणशिंग' हेंच नांव दिलेलें आहे.

गोरेगांवकरांची चाळ क्र. २.
गिरगांव, मुंबअी ४.

ग. पां. परचुरे

# अनुक्रमणिका

---

— १ —

# छत्रपतींचा जयजयकार !

'श्रद्धानंद,' मुंबअी
५-५-१९२७ अिसवी

[ हा लेख महाराष्ट्रांत शिवाजीमहाराजांचा त्रिशतसांवत्सरिक महोत्सव साजरा झाला त्या वेळीं 'श्रद्धानंद' पत्रासाठीं लिहिला होता : प्रकाशक ]

**रथस्यैकं चक्रं भुजगयमिताः सप्त तुरगाः ।**
**निरालंबो मार्गश्चरणरहितः सारथिरपि ॥**
**रविर्यात्येवान्तं प्रतिदिनमपारस्य नभसः ।**
**क्रियासिद्धिः सत्त्वे भवति महतां नोपकरणे ॥**

छत्रपति शिवरायांचा जन्मच अशा परिस्थितींत झाला कीं, सामान्य माणसाला शिवरायांनीं जी गोष्ट प्रत्यक्ष केली ती गोष्ट नुसत्या कल्पनेनें भावितां येणेंहि अशक्य होतें. वर अुद्धृत केलेल्या श्लोकांत 'क्रियासिद्धिः सत्त्वे भवति महतां नोपकरणे' या सनातन तत्त्वाचा सिद्धान्त स्थापन करण्याकरितां कवीनें जें अुदाहरण घेअून समस्यापूर्ति केली, त्या कवीच्या वेळीं जर श्रीशिवराय आणि त्यांचें चरित्र हें अस्तित्वांत असतें तर वरील सूर्याचें अुदाहरण व तत्सदृश मदनाचीं अित्यादि आणखी तीन अुदाहरणें तीन श्लोकांत न देतां केवळ श्रीशिवरायांच्या चारित्राचेंच अुदाहरण दिलें असतें. अितकें श्रीशिवरायांचें कार्य हें कठीण होतें. आजपर्यंत जगाच्या अितिहासांत सामान्य बुद्धीला आणि शक्तीला अशक्य वाटणाऱ्या कांहीं अपूर्व गोष्टी अलौकिक अवतारांनीं करून दाखविल्या, श्रीशिवरायांनीं जें कार्य केलें तें सर्वथैव तशाच अलौकिक कोटींतलें होतें. आजपर्यंत कित्येकांची अशी समजूत आहे कीं, शिवरायांनीं स्वराज्यस्थापना जी केली त्यांत काय मोठेंसें आहे? मोडकळीस आलेल्या विजापूरकरांशीं व आंतून पोंखरत चाललेल्या सत्तेशीं झुंज करून सह्याद्रीच्या अेका कोंपऱ्यांत अेक लहानसें राज्य त्यानें निर्माण केलें, ह्यांत अेवढें तें काय मोठें शतकृत्य! व त्याचे अेवढे ते काय देव्हारे माजवावयाचे !

वरील आक्षेप घेणारे लोक अेक तर अितिहासांत अज्ञानी असतात किंवा कांहीं तरी स्वतःचा स्वार्थी विवक्षित हेतु डोळयांपुढें ठेवून वरीलप्रमाणें लिहीत आणि शिकवीत असतात. तेव्हां शिवाजीमहाराजांविषयीं ज्याला सत्य अितिहास पहावयाचा असेल त्यानें ही अंधपरंपरा व परप्रत्यनेय बुद्धि टाकून देअून स्वतंत्रपणानें श्रीशिवरायांचें चरित्र आणि कार्य यांचें निरीक्षण केलें पाहिजे. शिवाजीमहाराजांच्या प्रचंड कार्याची कल्पना येण्यास केवळ दादाजी आणि मालोजी अेथपर्यंतचीच परंपरा पाहून चालावयाचें नाहीं. शिवाजीमहाराजांचें कार्य समजून घेण्यास कांहीं केवळ भोंसले कुळाचा अितिहास चाळून चालावयाचें नाहीं. तें कार्य आणि त्याचें महत्त्व पहावयास प्रथम हिंदु जातीनें आणि हिंदुस्थाननें त्यांच्यावर झालेल्या परकीय आक्रमणाला विरोध करण्याचा प्रयत्न थेट दाहिर-पृथ्वीराजापासून जो केला व पृथ्वीराजाच्या पतनानंतर ठायीं ठायीं हिंदुत्व रक्षण करण्याकरितां जे अनंत झगडे सुरू झाले, त्यांचाहि अितिहास लक्षांत घेतला पाहिजे. सातव्या-आठव्या शतकांत सिंध देशावर मुसलमानांचें पहिलें आक्रमण झालें. तेव्हांपासून बाराव्या शतकाच्या अखेरपर्यंत म्हणजे जवळजवळ सहाशें वर्षें मध्यआशियांतील व अिराण, अफगाणिस्तानांतील कांहीं धर्मवेडानें, कांहीं राज्यलोभानें, कांहीं पोट भरण्याकरितां, कांहीं लूट मारण्याकरितां ज्या मुसलमानांच्या स्वाऱ्या चालल्या होत्या व ज्यांचें अंतिम ध्येय हिंदुस्थानची हिंदु सत्ता नामशेष करून यवनांचा चांद सबंध हिंदुस्थानभर फडकाविण्याचा होता त्या स्वाऱ्यांशीं सतत सहाशें वर्षें हिंदु जातीनें टक्कर दिली. आणि ह्या सहाशें वर्षांच्या स्वसंरक्षक युद्धाचा अखेर परिणाम असा झाला कीं, ११९२ मध्यें हिंदुस्थानची सार्वभौम मानली गेलेली दिल्लीची सत्ता ही नामशेष झाली. हजारो हजार वर्षांपासून अखंड स्वातंत्र्य, अखंड स्वराज्य, अखंड सुख भोगीत असलेल्या आणि त्याच्याच अतिरेकानें विसंघटित, आळशी, सुखलोलुप झालेल्या हिंदु जातीला यवनांचें झालेलें हें आक्रमण केवळ प्राणसंकटच वाटलें. ११९२ सालीं पृथ्वीराजा पडला व त्यानंतर केवळ १०० वर्षांच्या आंतच सबंध अुत्तर हिंदुस्थान यवनमय होअून प्रत्यक्ष काळालाहि काळ भासणारे राजपुतान्यांतील सर्व रजपूत कांहीं किरकोळ अपवादानें पत्त्यांच्या बंगल्याप्रमाणें पटापट यवनी सत्तेपुढें विलयाला गेले. आणि बरोबर शंभर वर्षांनीं विंध्य पर्वताच्या अलीकडे दक्षिण हिंदुस्थानांत

यादवांचें प्रबळ राज्य जणूं क्षणार्धांत रसातळाला गेलें. नंतर कांहीं थोड्याच वर्षांच्या अवधींत अिस्लामचा घोडा अप्रतिहत वेगानें रामेश्वरचें पाणी प्याला. अेखाद्या पुराण जातीची आणि संस्कृतीची जशी मरणाची वेळ यावी तद्वतच प्रत्यक्ष मरणाचीच वेळ हिंदु संस्कृतीस व हिंदु जातीस त्या वेळीं आलेली होती. अशाच तऱ्हेची विगलित अवस्था अेका काळीं बलाढ्य रोमला प्राप्त झाली आणि त्याच्या सर्व वैभवासह तें रोम आणि अितरहि तसलींच वैभव-संपन्न राष्ट्रें पृथ्वीतलावरून पुसटून जाअून काळाच्या भक्ष्यस्थानीं पडलीं. तीच अवस्था बाराव्या शतकापासून हिंदु जातीची होअूं लागली होती. अुतरणीला लागलेला गाडा जसा शतगुणित वेगानें खालीं खालीं घसरत जातो, त्याच-प्रमाणें हिंदु जातीहि वैभवशिखरावरून खालीं खालीं घसरत थेट मृत्यूच्याच जबड्यांत अतीव वेगानें घुसत आहे असें भासूं लागलें होतें. सर्व मोठमोठीं हिंदु राज्यें तर नामशेष झालींच होतीं; परंतु कांहीं काळपर्यंत विजया-नगरला हिंदु स्वातंत्र्याचा जो दीप अडीच शतकें विवक्षित भागांत का होअीना स्वातंत्र्याचा प्रकाश देत होता, तोहि तालिकोटच्या रणामध्यें हिंदु जातीच्या दुर्दैवाच्या प्रभंजनानें मालवून गेला. तेव्हांपासून हिमालयापासून रामेश्वरापर्यंत आणि सिंधु नदीपासून तो ब्रह्मपुत्रापर्यंत सर्व हिंदुस्थानभर पारतंत्र्याचा, निराशेचा, हतबलत्वाचा गडद अंधार पडला आणि सबंध हिंदुस्थान हें अेखाद्या नुकत्याच मरण पावून प्रेत बाहेर काढलेल्या धन्याच्या घराप्रमाणें मृत्यूच्या छायेनें अुदास, भयाण, ओसाड भासूं लागलें. प्रत्यक्ष काशीचा विश्वेश्वर आणि अयोध्येचा राम हे स्थानभ्रष्ट होअून अवमानित झाले होते आणि तोडरमल्लासारखी राजकार्यधुरंधर बुद्धि, राजा मानसिंगा-सारखें दुर्दमनीय शौर्य, तानसेनासारखें स्वर्गीय गायन आणि पंडित जगन्नाथरायासासारखी अलोट विद्वत्ता आणखी मनाला मोहून टाकणारी कविता ही सर्व हिंदूंतील सद्गुणमालिका परकीयांच्या पायांपाशीं दासी-प्रमाणें राबत होती. यःकश्चित् मनुष्यासारखा मनुष्य परंतु तो दिल्लीच्या मुसलमानी गादीवर आरूढ होअून ‘ दिल्लीश्वर ’ झाल्याकारणानें प्रत्यक्ष ‘ जगदीश्वर ’ वाटावयास लागला होता आणि त्या ‘ जगदीश्वरा ’च्या पायां-पाशीं आपली मान, आपला अभिमान आपलें चित्त, आपलें वित्त, अितकेंच काय, परंतु आपलें कलत्र देखील अर्पण करण्याअितकी हीन दास्याची वृत्ति

त्या वेळच्या अुत्तम गणलेल्या हिंदु समाजांतल्या मोठमोठ्या व्यक्तींनीं निर्लज्जपणें अंगीकारिली.

सारांश, सगळ्या हिंदु जातीवर मरणाची अवकळा आली होती, नाकाशीं सूत धरलें होतें.

अशा वेळीं 'पृथ्वी आंदोळली! धर्म गेला!' अशी संतप्त हृदयाची करुण हांक सर्व हिंदुस्थानभर निराश झालेल्या हतभागी लोकांना क्षणोक्षणीं अैकूं येत होती. आणि तरीहि कोणी हिंदु ही हांक अैकून तिला ओ देण्याअितका समर्थ नव्हता. फार फार तर सरदार व्हावें, 'प्यादाचा फर्जी व्हावें,' फार फार तर यवनी सिंहासनाला मुजरा करण्याचा मान मिळावा, अेवढीच आकांक्षा त्या वेळच्या हिंदु जातींतील तरुण पिढीमध्यें दृग्गोचर होत होती. हिंदूंच्या ह्या अत्यंत हीन आणि दीन अशा अवनतीबरोबरच मुसलमानांच्या अैश्वर्याची, सत्तेची आणि पराक्रमाची कमान चढती होती. अुत्तर हिंदुस्थानांत तर मोंगल बादशहाची सत्ता अप्रतिहत रीतीनें स्वर्गांत प्रत्यक्ष अिंद्र जसा प्रबळ त्याप्रमाणें सिंहासनारूढ झाली होती. आणि दक्षिण हिंदुस्थानांत बहामनी राज्याचा विस्तार होअून त्याच्याच पांच प्रबळ शाखा सबंध दक्षिण हिंदुस्थान व्यापून बसल्या होत्या.

कोठेंहि अल्पसा सुद्धां आशेचा किरण निरीक्षून निरीक्षून देखील दृष्टिपथांत येत नव्हता. हिंदु लोकांच्या मनोवृत्तीवर निराशेची अितकी छाप बसली होती कीं, प्रत्यक्ष अहमदनगरचें निजामशाहीचें सिंहासन स्वतःच्या पराक्रमावर ज्यानें हस्तगत केलें, त्या शहाजींना त्याच सिंहासनावर स्वतः बसणें हें कसेंसेंच वाटूं लागलें आणि मुसलमानी बादशहाचें अेक नाममात्र बालक मांडीवर घेतल्यावांचून त्यांना सिंहासनावर आपली मांड स्थिर ठेवतां आली नाहीं. अितकी आत्मवंचना, अितकी निराशेची परासीमा, अितकी अवनतीची शेवटची खोली हिंदु जातीला त्या वेळीं प्राप्त झाली होती.

अशा परिस्थितीमध्यें सतरावें शतक अुजाडलें आणि प्रभु शिवरायांचा जन्म झाला. सामान्य तर काय, परंतु असामान्य दृष्टीलाहि या वेळीं स्वराज्याची,

हिंदवी राज्याच्या स्थापनेची कल्पना मृगजळाप्रमाणें अशक्य वाटत होती. भोंवतालची सर्व परिस्थिति अशी निराशाजनक असतांहि शिवरायांच्या मनामध्यें हिंदवी साम्राज्याचे जे गगनगामी गंभीर विचार अगदीं कुमार अवस्थेपासून अुद्‌भूत झाले, यांतच शिवाजीमहाराजांचा अद्‌भुतपणा ! वयाच्या केवळ तेराव्या वर्षीं कीं, ज्या वेळीं सामान्य बालकें अेकटीं अंधारांत जायला भितात आणि ज्ञानाचे श्रीगणेशाचे धडेहि आकलन करण्यास असमर्थ असतात, त्या वेळेला शिवाजीमहाराजांनीं देशांतील पारतंत्र्याच्या गडद अंधकारांत त्याचें अुच्चाटन करण्याकरितां अुडी घातली आणि स्वातंत्र्यसंपादनाचे दिव्य धडे त्यांनीं आपल्या संवगड्याला देण्याला आरंभ केला. 'प्रतिपत्‌चंद्ररेखेव वर्धिष्णुर्विश्ववन्दिता । शाहसूनोः शिवस्यैषा मुद्रा भद्राय राजते' असल्या भव्य महत्त्वाकांक्षेनें ज्यांच्या आयुष्याचें ध्येय वयाच्या केवळ तेराव्या वर्षींच निश्चित झाले होतें ते शिवराय असामान्य, अलौकिक होते ह्यांत काय संदेह आहे ?

तेव्हां शिवरायाच्या चरित्राची कामगिरी तोलतांना केवळ शहाजी-मालोजीपर्यंतचीच परंपरा पाहून किंवा भोंसले कुळाचाच अितिहास लक्षांत घेअून चालायचें नाहीं; तर त्याच्या पाठीमागें अनेक शतकांच्या परंपरेला व हिंदूंच्या अनंत कुळांच्या अितिहासाला यथावत् जाणलें पाहिजे म्हणजे शिवचरित्राचें खरें अद्‌भुतपण लक्षांत येअील. त्याचप्रमाणें अशी अेक भ्रांतिकारक कल्पना वर लिहिल्या गेलेल्या अितिहासांतून बिंबवली जाते कीं, विजापूरकरांचें राज्य हें मोडकळीस आलें होतें आणि त्या मोडकळीस आलेल्या अव्यवस्थित राज्यामध्यें शिवाजीनें आपली 'पुंडाअी' चालू केली यांत काय शौर्य आहे ? परंतु हें विधान सर्वथैव असत्य आहे. त्या वेळीं विजापूरची अदिलशाही ही मोडकळीस तर आली नव्हतीच; परंतु तिच्या काळांतील तो अेक अुत्कृष्ट काळ होता. नुकतेंच बुडविलेलें शेजारच्या मुस्लीमशाहीचें राज्य अर्धेअधिक घशांत घालून व शहाजीमहाराजांच्या पराक्रमानें प्राप्त झालेला कर्नाटक आपल्या राज्याला जोडून विजापूरची अदिलशाही तिच्या अितिहासांतील 'न भूतो न भविष्यति' अशी विस्तार पावली होती. अुत्तरेंतल्या मोंगल बादशहाच्या खालोखाल जर कोणती अेखादी मुसलमानी सत्ता त्या वेळीं अस्तित्वांत होती तर ती विजापूरची अदिलशाहीच होती.

कुबेराची संपत्ति विजापूरच्या कोशागारांत अविरतपणानें वाहात होती. कर्नाटकाच्या संपन्न प्रांतांतून धनकनकाचा संग्रह होत होता. विजापूरचें चतुरंग सैन्य रणदुल्लाखान, मुरार जगदेव, शहाजी राजे ह्या रणकुशल सेनापतींच्या आधिपत्याखालीं दिग्विजय करीत होतें. दक्षिण हिंदुस्थानमध्यें अग्रपूजेचा मान विजापूरच्या सत्तेचाच होता आणि जर शिवाजी झाला नसता, तर थोड्याच वर्षांत अखिल हिंदुस्थानच्या अग्रपूजेचा मान कोणाचा— उत्तरेकडील मोंगल बादशहाचा का दक्षिणेंतील विजापूरच्या बादशहाचा, हा प्रश्न सोडविण्यास दोन्ही यवनी सत्तांमध्यें तुमुल युद्ध झालें असतें.

या सिंहावलोकनावरून हें ध्यानांत येईल कीं, विजापूरचें राज्य मोडकळीला आलें होतें म्हणून शिवाजीमहाराजांचा प्रयत्न यशस्वी झाला असें नव्हे तर शिवाजीमहाराजांचा प्रयत्न यशस्वी झाला म्हणून विजापूरची प्रबळ अदिलशाही मोडकळीस आली. शिवाजीनें पोखरून ठेवलेल्या ह्या अदिलशाहीच्या आहुतीचा स्वाहाकार पुढें औरंगजेबाला लीलेनें करतां आला. अदिलशाही मोडकळीला आली असती तर मलिकंबरासारख्या, लखूजी जाधवासारख्या, शहाजीराजासारख्या निजामशाहींतील प्रबल सरदारांच्या फटक्यासरशीं ती गारद झाली असती व शहाजहानच्या पहिल्या स्वारीच्या तडाक्यालाच ती मोंगल सत्तेला बळी पडली असती; परंतु जें कार्य निजामशाहीला करतां आलें नाहीं, बेदरच्या बरीदशाहीला करतां आलें नाहीं, उत्तरेंतल्या शहाजहानला करतां आलें नाहीं तें अत्यंत अवघड कार्य शिवरायानें मोठ्या धाडसानें हातामध्यें घेतलें आणि तें कशाच्या साह्यावर ? विजापूरच्या कुबेराच्या धनापुढें तोरणा किल्ल्यांतील दगडमाती खणतां खणतां सांपडलेल्या एका क्षुद्र हंडाभर मोहरांच्या! विजापूरच्या सुसज्ज चतुरंग सैन्याशीं मरणमारणाची देवघेव करण्याकरितां कृश देह धारण करणाऱ्या, वनवनांतरीं जीवित कंठणाऱ्या, भुकेनें तडफडणाऱ्या कांहीं मावळ्यांच्या पथकांच्या ! रणदुल्लाखानासारख्या आणि मुरारजगदेवासारख्या वर्षेंचीं वर्षे राजकारणांत आणि मुत्सद्दीपणांत घालविलेल्या राजकारण-धुरंधरांशीं कारस्थानें केलीं तीं विशीच्या आंतील असलेल्या अननुभवी तानाजी, मोरोपंत अित्यादि अल्लड तरुणांच्या संगनमतानें हें द्वंद्व असमान नव्हे काय ? आणि असें असूनहि या द्वंद्वामध्यें शिवरायानें यश मिळविलें !

आणि अशी ही असमानतेची 'झुंज' अेकीकडे विजापूरकरांशीं लढत असतां त्यांतच शिवाजीचें धैर्य, शौर्य हें आटलें का ? नाहीं; तर अेका हातानें विजापूरच्या यवनी सत्तेची दाढी प्रतापगडावर, पन्हाळ्यावर, पानखिंडींत हिसडीत असतांच आणि त्या हिसडण्यानेंच विजापूरच्या यवन बादशहांच्या मस्तकावरील मुकुट कंपायमान होत असतांच शिवरायानें निर्धास्तपणें आणि अतुल आत्मविश्वासानें त्यांच्या पूर्वपिढ्यांना 'जगदीश्वरा' प्रमाणें वाटणाऱ्या दिल्लीश्वराला सुद्धां त्याच्या दाढीला हात घालून गदगदां हालवून सोडलें. ज्या दिल्लीश्वराच्या केवळ भ्रुकुटिक्षेपानें दुबळ्या झालेल्या हिंदु राजांचे मुकुट स्थानभ्रष्ट होअून गळून पडत आणि ज्याच्या कोपाच्या भयानें मी मी म्हणविणारे जयसिंहासारखे रजपूत वीर गर्भगळित होत असत, त्या अखिल हिंदुमात्रास भयविषय झालेल्या मोंगल बादशहास शिवाजीच्या भयानें चिंताक्रान्त करून सोडलें.

पण केवळ अशा पराक्रमानेंच शिवाजीमहाराज थोर म्हटले गेले काय? जर केवळ अेका पराक्रमानेंच ते थोर असते तर त्यांचे आज अेवढे देव्हारे माजले नसते. कारण केवळ पराक्रमीच असणारे अनेक हिंदु त्या वेळीं यवनी 'सेवेंत' राबत होते; परंतु त्यांचे देव्हारे कोणीं माजविले नाहींत. अेकटा पराक्रम कांहीं मृत राष्ट्र जिवंत करूं शकत नाहीं; कांहीं स्वातंत्र्य मिळवीत नाहीं; तर त्या पराक्रमाला कोणत्या तरी दिव्य ध्येयाचें आणि युद्धकौशल्याचेंहि साह्य हवें असतें.

शिवरायानेंहि मुसलमानांशीं लढण्याची आपल्याला अनुकूल अशी अेक नवीन पद्धत शोधून काढली. मुसलमान हे समोरासमोर तलवारीचें युद्ध करण्यांत मोठे निष्णात असत. त्यांचा धिप्पाड देह, पुष्ट शरीर आणि अचाट शक्ति ह्यांच्या योगानें रजपुतांविना अितर हिंदु जाती त्यांच्यापुढें हीनबळ ठरल्या आणि मुसलमानांची लांब तलवार समोरासमोर येतांच ती अधिक प्राणघातक होअूं लागली. प्रत्यक्ष रजपूतहि त्या तलवारीच्या युद्धांत फार फार तर बरोबरी करूं लागले; पण बरोबरी केल्यानेंच कांहीं शत्रु मरत नाहीं ही गोष्ट लक्षांत घेअून शिवरायानें मुसलमानांच्या प्रखर समशेरीच्या आणि प्रचंड देहाच्या आटोक्याबाहेर राहून अमोघ प्रहार करणाऱ्या भाल्याच्या शस्त्रा-

वर अधिक भर दिला. त्यामुळें तलवारींच्या लांबीबाहेर अुभें राहून आपल्या त्रिशूळासारख्या तीव्र भाल्याचा नेम अचूकपणानें मारण्यांत बुटक्या मावळ्यांचे तरबेज झालेले डोळे मोंगल पठाणांच्या हृदयावर आघात करण्यास समर्थ झाले व यवनी सैन्य मराठ्यांशीं आंगलट करण्याच्या आधींच हतप्रभ होअूं लागलें. ही 'मराठी भाल्याची फेंक' केवळ सह्याद्रीच्या गिरिशिखरावरून, पठारावरून आणि दऱ्याखोऱ्यांमधून लंगोट्या मावळ्यांच्या हातांनींच यशस्वी झाली असें नव्हे तर ज्या वेळीं लंगोट्या मावळ्यांचें क्षुद्र पथक वाढत वाढत थोरल्या बाजीरावांच्या काळीं गंगेच्या प्रचंड ओघाप्रमाणें हिंदु-पदपादशाहीच्या चतुरंग दळाच्या योग्यतेला पोंचलें, अिकडे हिमालयाचा पायथा गांठला नि तिकडे अटकेला भिडलें तेव्हां सिंधु नदीच्या वाळवंटांत भाल्याच्या काठीवरच भगवा झेंडा रोवला.

सैनिक-वेषांतहि शिवाजीमहाराजांनीं कल्पकता दाखविली. यवनाच्या अैषारामी भरगच्चीच्या किनखाबी अगडबंब अंगरख्याला गुंडाळून शिवाजीनें मावळ्यांना अंगासरशी असलेली हातभर बंडी दिली आणि अघळ पघळ रुळणाऱ्या पायजम्यांना चाट देअून सुटसुटीत आणि खुटखुटीत असा मांडचोळणा घालणारी मावळ्यांची सेनाहि तशीच सुटसुटीत बनली. यवनांच्या सैन्याचा पसारा, त्यांचें शिबिर म्हणजे अेक मोठें नगरच वसावयाचें; त्याला हैराण करण्यासाठीं शिवरायांनीं आपल्या मावळ्यांच्या सेनेला वाऱ्याप्रमाणें भराऱ्या मारायला शिकविलें.

अशा रीतीनें दूरवेधक शस्त्र, सुटसुटीत वेष, चपल सैन्यरचना योजून या प्रत्येक प्रकरणीं यवनी सैन्यापेक्षां आपलें सैन्य शिवरायानें अधिक समर्थ केलें आणि मग अशा सैन्याला झेपेल अशी युद्ध करण्याची नवी पद्धति त्यांनीं अंगीकारिली. ही पद्धति म्हणजे मराठ्यांची प्रसिद्ध 'गनिमी काव्या' ची पद्धत, 'वृकयुद्ध' होय. सहज पेलतां येण्यासारखें भाल्याचें शस्त्र, सुटसुटीत वेष, वाऱ्याप्रमाणें भटकणारे चपल तट्टू, यांनीं सिद्ध झालेलें शिवरायांचें मूठभर हिंदु सैन्य मुसलमानांच्या हजारों हजार अवाढव्य सैन्यावर आकाशांतून वीज पडावी तसें तुटून पडे व विजेप्रमाणें जाळपोळ करीत डोळ्याचें पातं लवतें न लवतें तों अेकदम कुठेंच्या कुठें अंतर्हित होअून जावें.

अेखाद्या ज्वालामुखीच्या पृष्ठभागावर हरिततृणांनीं आच्छादिलेली भूमि पाहून ज्या निर्धास्तपणानें अजाण पांथस्थ निवास करतात, त्याच निर्धास्तपणानें यवनांचीं सैन्यें महाराष्ट्राच्या भूमीवर विश्रांति घेत पडत. त्याच वेळीं ज्वालामुखीचा अकस्मात् स्फोट व्हावा व त्यांतून अग्निरसाचे लोट वाहूं लागावे तद्‌वत् 'हर हर महादेवा'च्या प्रचंड, गर्जनेंत मावळ्यांचें कर्दनकाळ भासणारें सैन्य दऱ्याखोऱ्यांतून अुफाळावें आणि मुसलमानांना हत्यारें पकडण्याचा अवसर न देतां तुडवीत, बडवीत, लुटालूट करीत पुनः कुठल्याशा अज्ञात दिशाविदिशांत विलीन होअून जावें. अुलटपक्षीं चढाअी करतां करतां मुसलमानांचें सैन्य न झेपेल अितकें मोठें भासलें कीं, लगेच तडक माघारां पाय घ्यावा, मागें हटावें व जवळपास असलेल्या किल्लेखोऱ्यांत गडप व्हावें किंवा कैक वेळां असें मागें हटतां हटतां तात्कालिक विजयानें फुगून गेलेलें यवनी सैन्य विस्कळित दिसतांच पुनः अुलटून पडून घे घे मार करीत पराजयाचें जयामध्यें रूपांतर करावें. शत्रूची असावध आघाडी मारावी, ती सावध होतांच तेथून निसटून त्याच्या पिछाडीस दत्त म्हणून अुभें राहावें आणि तीहि मारून शत्रूची यथेच्छ लूट मिळवून शहाजोगपणानें यवनी सैन्याला वांकुल्या दाखवीत आपापल्या गडकोटांत निघून जावें. अशी ही गनिमी काव्याची पद्धत शिवाजीराजांनीं त्या वेळच्या युद्धकलेंत प्रचलित केली. त्या वेळच्या युद्धशास्त्रामध्यें त्यांचें अपूर्व योजकपण, अपूर्व कौशल्य आणि अपूर्व समयज्ञता दिसून आली.

भूमीवरच्या सैन्याची अशी नवीन थाटाची अुभारणी करून शिवाजीमहाराजांची कुशाग्र बुद्धि थांबली नाहीं, तर त्यांनीं त्या वेळपर्यंत कोणाहि मुसलमान राजानें लक्षांत न घेतलेली अेक नवीन शक्ति निर्माण केली. आणि ही शक्ति म्हणजे सिंधु-सैन्याची. तोंपर्यंत मुसलमानी सत्तेंत मोठें नौकादल म्हणजे मोगलांचें व त्यांचा नौकादलाधिपति कोण? तर म्हणे जंजिऱ्याचा सिद्दी! ह्या सिद्दीनें मक्कामदिनेचे यात्रेकरू सुरक्षित आणण्यानेण्यापलीकडे व सामान्य व्यापार चालविण्यापलीकडे कांहीं अेक कार्य केलें नाहीं व त्यामुळें मुसलमानांच्या आरमाराचा धाक युरोपियन सिंधु-सैन्यास वाटत नसे, किंवा त्याचें मोंगली सत्ता वाढविण्यास साह्य झालें नाहीं; परंतु शिवाजीमहाराजांनीं ज्या समुद्रावर सबंध कोंकणपट्टींत अेकहि

नाव मराठ्यांच्या नांवानें वावरत नव्हती तेथें केवळ दहा-पंधरा वर्षांच्या अवधींत एक व्यवस्थित, अत्यंत धाडसी व पाश्चात्यांच्याहि नौकादलास आणि त्यांच्या चांचेगिरीस धाक वाटावा असें अेक नौकादल—अेक सिंधुसैन्य निर्माण केलें.

शिवरायांनीं सर्व कोंकणपट्टी निरीक्षून अत्यंत कुशलपणानें आणि जन्मजात दूरदृष्टीनें मालवण, विजयदुर्गासारखे अभेद्य जलदुर्ग बांधून ठिकठिकाणीं मान्याच्या जागांवरून अेकीकडे समुद्र दुसरीकडे भूमि रक्षित केली. ह्याचकरितां शिवरायांना किल्ले जंजिरा नेहमीं आपल्यास हवासा वाटे. शिवाजीमहाराजांचें अेकाकी नौकादल अल्प अवधीमध्यें समुद्रयुद्धांत अितकें निष्णात झालें कीं, त्यानें पोर्तुगीझांस धाक बसविला, सिद्दीला हैराण केलें आणि प्रत्यक्ष अिंग्रजांना खांदेरी-अुंदेरीला मुंबअीच्या छातीवर जणूं पिस्तुल रोंखून नरम आणलें.

आतांपर्यंत आपण शिवरायांना केवळ वीर म्हणून, कल्पक आणि धाडसी सेनापति म्हणून निरीक्षिलें; परंतु अेवढ्यानेंच शिवरायाचें महत्त्वमापन सरलें नाहीं. हा केवळ अेक देश झाला. वीरामध्यें क्वचित् सांपडणारें राजनीतीनिपुणत्व शिवरायामध्यें विपुलपणानें भरलेलें होतें. परशत्रूशीं झगडा चाललेला असतांना केव्हां पड खावी, केव्हां अुठाव करावा हें जाणण्यास व कमींत कमी हानीचा आणि जास्ती लाभाचा मार्ग शोधून काढण्यास, त्याचप्रमाणें निष्कारण शौर्याचें प्रदर्शन न करतां अवश्य तेव्हांच त्याचें आविष्करण करण्यास मुत्सद्देगिरी अंगीं लागते. कपटानें घात करणाऱ्या अफझुलखानाला आधींपासूनच सावधानता ठेवून त्याचें कपट अुघडकीस येतांच बेधडकपणें आणि धैऱ्याची परमावधि दाखवून पोट फाडून मारावें केव्हां आणि जयसिंगासारखा अुदारहृदय रजपूतराजा मुसलमानांच्या वतीनें हिंदु रक्त सांडण्यास आला असतां त्याच्याशीं मानपान गुंडाळून ठेवून आणि सुरक्षिततेचें अेकहि साधन हातीं न ठेवतां पूर्ण विश्वासानें त्याच्या स्वाधीन व्हावें केव्हां, त्याचप्रमाणें शहाजीराजे विजापूर-करांनीं दगा करून भिंतींत चिणून मारण्याच्या धमकीनें बंदींत घातले असतां अत्यंत अल्पावधींत अगदीं दीनवाणीनें शहाजानास आपल्या बाजूला

वळवून घेऊन विजापूरकरांवर शहाजीला सोडण्याअितकी दहशत पाडण्याकरितां मोंगलांचें मांडलिकत्व मान्य करावें केव्हां व प्रसंग येतांच विजापूरकरांशीं संगनमत करून मोंगलांना पिटाळून लावावें केव्हां हे सर्व कारस्थानी डाव-पेंचही वीर शिवाजी लढवीत होता.

त्यांच्या अचाट धैर्याची आणि अकल्पनीय कल्पनेची चुणूक आग्र्याला झालेल्या त्यांच्या बंदिवासांत सांपडेल. आजपर्यंत पुष्कळ बंदी निरनिराळ्या मार्गांनीं आपापल्या बंदीशालांतून पळून गेले असतील. कोणीं भिंत फोडून, कोणीं तटावरून अुडी टाकून, कोणीं भुयारें खणून बंदीचा अंत केला असेल; परंतु शिवरायांनीं औरंगजेबासारख्या कपटमुकुटमणीच्या कचाट्यांतून निसटण्याची जी अद्‌भुत युक्ति योजिली, ती पाहून अितिहासहि तोंडांत बोट घालून थक्क झाला! प्रत्यक्ष सिंहाच्या गुहेंत प्रवेश करणें व सर्व अैहिक वैभवाच्या शक्तीनें प्रबळ झालेल्या मोंगल दरबारांत प्रवेश करणें हें सारखेंच भयास्पद समजलें जात होतें; परंतु अशा त्या दरबारांत प्रवेश करतांच बावळटाप्रमाणें गोंधळून न जातां मान-पान होण्यांत जरा कसूर झाली हें पाहतांच ज्याचें आत्मतेज अुसळून अुठलें व त्या सिंहाच्या मिशा अुपट-ण्यास सिद्ध झालें तें आत्मतेज आणि तें धैर्य काय सामान्य प्रतीचें असेल? दक्षिण दुरावली, अुत्तर परकीय झाली, जयसिंहाच्या वचनाचें संरक्षण अपुरें पडलें, रामसिंगाचें चालेनासें झालें, बरोबरचें सैन्य दर्यांमें खसखस-प्रमाणें झालें आणि स्वतःचे राज्य पोरकें झालें आणि तरीहि निराश न होतां स्थितप्रज्ञ योग्याप्रमाणें सर्व परिस्थितीचें निरीक्षण करून ज्या बुद्धिमत्तेनें पेटाऱ्यांतून लहान मुलगा संभाजी ह्याच्या लोढण्यासह निसटून जाण्याची अपूर्व योजना कल्पिली त्या बुद्धिमत्तेचें कौतुक किती करावें! अशा रीतीनें सिंहाच्या मिशा अुपटून त्याच्या नाकावर टिच्चून निसटून गेल्यावर सुद्धां शिवाजीमहाराजांनीं दक्षिणेंत येण्याला जो मार्ग निश्चित केला तो पाहून तर मति कुंठित होते. कोणीहि सामान्य मनुष्य अुत्तरेंतून निसटल्याबरोबर दक्षिणेस आपल्या घराकडे तडक चालता झाला असता; परंतु शिवराय असामान्य होते. औरंगजेब हा शेर आहे आणि त्याला सव्वाशेरपणा दाखविल्यावांचून आतां सुटका नाहीं म्हणून त्यांनीं हा सामान्य मार्ग न पत्करतां अेक औरंगजेबासहि अतर्क्य असा मार्ग शोधून काढला. दक्षिण

दिशा वर्ज्य तर साहजिकच अेखादा हिंदु मनुष्य योगी-जोगी बनून हिमालयांतल्या पुण्यक्षेत्रांकडे लपतछपत फिरेल ह्या भरंवशानें बादशाहानें मारे धुमाकूळ करून दक्षिणअुत्तर दिशा रोखून ठेवल्या; परंतु त्या खुळ्या औरंगजेबाला काय माहीत, कीं हा मराठ्यांचा राजा शेराला सव्वाशेर आहे. शिवरायांनीं प्रथम पूर्वेकडचा मार्ग पत्करला व प्रयाग, गया करीत करीत अेकदम अेखाद्या धूमकेतूप्रमाणें ते जगन्नाथपुरीवर अुतरले व तेलंगणांतून मार्ग काढीत काढीत कुतुबशाहाच्या राज्यातून अत्यंत कौशल्यानें पुनरपि केवळ नअु महिन्यांच्या आंत अेवढ्या प्राणसंकटांतून सुटून आणि कपट-नाटकांत प्रवीण झालेल्या औरंगजेबास चकवून श्रीशिवराय रायगडावर अुदित झाले.

शौर्य, कारस्थानीपणा, कल्पकता, धाडस अित्यादि त्यांच्या अपूर्व गुणांचें आपण निरीक्षण केलेंच; आतां त्यांच्या संघटणाकौशल्याकडे जर आपण बघूं लागलों तर तेथेंहि आपल्याला थोर व्यक्तित्व दिसून येतें. निर-निराळ्या योग्यतेचे स्वराज्यस्थापनेला अवश्य असणारे सर्व योग्य तरुण त्यांनीं वेंचून घेतले व त्यांच्यांतूनच त्यांनीं तानाजी, येसाजी, बाजी, मोरोपंत, सेनापति हैबतराव, वीरवर प्रतापराव गुजर, अित्यादि अनेक स्वातंत्र्यवीर निर्माण केले. हिंदु जातींतील अठरापगड अुपजातींतून त्यांनीं अठरापगड समर्थ लोक निवडून काढले. ब्राह्मण, प्रभु, मराठे, भंडारी, कायस्थ, अितकेंच काय परंतु अस्पृश्य बंधु, महारमांगबेरडांसुद्धां त्यांनीं आपल्या स्वराज्यघटनेच्या पवित्र कार्यांत संमीलित करून घेतले. कुणाला कारकुनी, तर कुणाला शिलेदारी देअून ज्याच्या त्याच्या योग्यतेप्रमाणें ज्याला त्याला जवळ-दूर धरलें आणि लोहचुंबकाप्रमाणें सर्वांचें प्रेम आकर्शित करूनसुद्धां सर्वांवर आपला धाक ठेवला. त्यांच्या शिक्षणांत सिद्ध झालेले जेवढे जेवढे लोक होते तेवढे तेवढे राजाराम-महाराजांच्या वेळीं व तदनंतर झालेल्या २५ वर्षांच्या स्वातंत्र्यसमरांतहि कामाला आले.

प्रो. यदुनाथ सरकार ह्यांनीं ता. १ मे १९२७ च्या 'क्रॉनिकल' पत्राच्या शिवाजी-अंकामध्यें अेक लेख लिहिला आहे. त्यामध्यें शिवाजीनें

राष्ट्र निर्माण केलें काय? असा अेक प्रश्न टाकून त्याचें अुत्तर नकारात्मक दिलेलें आहे. दीड शतकानंतर शिवाजीनें अुत्पन्न केलेलें राज्य गेलें आणि अठराशें-अठरा सालीं पेशव्यांचा पराभव झाल्यावर घराकडे फिरणाऱ्या सैन्याला जनतेनें संत्रस्त केलें असें मनरो नांवाच्या अितिहासकाराचें म्हणणें आहे आणि त्या अेका सद्‌गृहस्थाच्या म्हणण्यावरून शिवाजी-महाराज हे राष्ट्रनिर्माते नव्हते असें प्रो. सरकार सिद्ध करूं पहात आहेत. वादविवादाकरितां वरील सर्व म्हणणें जरी खरें धरलें तरी काय सिद्ध होतें? केवळ स्थापन केलेलें राज्य लवकर बुडालें म्हणून काय त्यांनीं राष्ट्र निर्माण नाहीं केलें? मराठ्यांच्या पंचवीस वर्षांच्या स्वातंत्र्ययुद्धांत राजारामाचे वेळीं जी चिकाटी, जें धाडस, जी अपूर्व राष्ट्रभक्ति दिसून आली ती काय शिवाजीनें राष्ट्र निर्माण केलें नसतें तर दिसून आली असती? आपल्या वतना-वर पाणी सोडण्यांत जर राष्ट्रीय दृष्टि नसती तर काय खंडो बल्लाळ सिद्ध झाले असते? राष्ट्रीय दृष्टि नसती तर संताजी घोरपडे, धनाजी जाधव, परसोजी भोंसले, पानसंबळ आणि ितर अनेक शत शत तरुण महाराष्ट्र-वीर लोखंडाचे चणे खातां खातां रक्त सांडीत सांडीत स्वातंत्र्यसमर चालवूं शकले असते? अेक फितुरीचें कृत्य जरी केलें असतें, तरी मोंगलांनीं कोणत्याहि क्षुद्र पाअिकाला नाअीक केलें असतें आणि नाअिकाला सरदार बनविलें असतें; परंतु या सर्व पारतंत्र्याच्या वैभवावर लाथ मारून सबंध जन्मभर रानावनांतून वणवण करीत महाराष्ट्राचें दोन लाख वीर-सैन्य पंचवीस वर्षेंपर्यंत झगडत, मारीत, मरत हिंडलें असतें? आपापसामध्यें चुरशीनें लढणारे धनाजी-संताजी मुसलमानांचें सैन्य येतांच जर राष्ट्रीय वृत्ति नसती तर काय अेकत्र होअून व वैर विसरून जाअून मुसलमानांशीं लढले असते? अितकेंच कशाला, परंतु मनरोसाहेब ज्या शेवटच्या पेशव्यांच्या दिवसांबद्दल गोष्ट बोलतो त्याच दहाबारा वर्षांच्या आगेंमागें भागानगरच्या निजामाच्या दरबारांत असलेल्या गोविंदपंत काळे या राष्ट्रभक्त वकिलाचें नाना-महादजींचा समेट झाल्यावर नानांना आलेलें अत्यंत मार्मिक आणि देशभक्तीनें ओतप्रोत भरलेलें पत्र मनरोसाहेबांनीं वाचलें का? त्यांनीं जरी वाचलें नसलें तरी श्री. यदुनाथ सरकारनीं तरी तें वाचलें असेल ना? पर्शियन ग्रंथकारावरून व मोंगली अुर्दू दप्तरांतील बाडांतूनच काय ती ज्यांनीं मराठ्यांच्या अितिहासाची

भूमिका अभ्यासिली असे पूर्वग्रहदूषित अहंकारविमूढ नि मराठी अितिहासाचें हृद्गत न समजणारे श्री. यदुनाथ या पत्राचा जरा शांतपणानें विचार कशाला करतील? मनरो काय म्हणतो तेंच तेवढें त्यांचें वेदवाक्य! पुन्हा दीडशें वर्षेपर्यंत शिवाजीनें प्रचालित केलेल्या हिंदवी साम्राज्याच्या ध्येयानें महाराष्ट्रवीर जे लढले तो दीडशें वर्षांचा काळ काय अगदीं अत्यल्प झाला? मग ह्याच विधानानुसार गेल्या महायुद्धांत कंबर मोडलेलें जर्मनीचें राष्ट्र ज्याच्या प्रयत्नानें अेक संघटित साम्राज्य झालें होतें त्या प्रिन्स बिस्मार्कलाहि केवळ दीडशें वर्षे तर राहो, पण शंभर वर्षे सुद्धां त्याची संघटना टिकली नाहीं म्हणून राष्ट्रपित्याच्या टिपणींतून काढून टाकावें लागेल. अजरामर राज्य असें कोणाचेंच टिकलें नाहीं–म्हणून राष्ट्रनिर्माता असा जगांत कोणीच झाला नाहीं म्हणावयाचा? समर्थ आणि शिवाजी ह्यांनींच महाराष्ट्रास व्यक्तिमत्त्वाची जाणीव दिली, अेकजीव केलें. 'अेकराट' केलें.

**'या भूमंडळाचे ठायीं। हिंदु अैसा उरला नाहीं॥**
**मराठा तितुका मेळवावा। आपुला महाराष्ट्रधर्म वाढवावा।**
**ये विषीं न करतां तकवा। पूर्वज हांसती॥**

ही हांक सह्याद्रीच्या शिखरांवरून रामदासाने पुकारली. शिवाजीनें शपथ घेतली ती 'हिंदवी' (हिंदूंचे) राज्य स्थापण्याची! 'तुम्ही हिंदु आम्ही हिंदु' म्हणून शिवाजीनेंच जयसिंगाला सांगितलें. विस्कळित महाराष्ट्रांतलीं 'रत्नें वेंचून वेंचून त्यांची माळ गुंफली.' 'दिल्लींद्रपदलिप्सवः' चीं सैन्यें दिल्लीच्या रोखें चालूं लागलीं. रामदास–शिवाजीच्या पिढीचेच हे सारे शब्द आहेत. रामदास-शिवाजीच्या ह्या स्फूर्तीनेंच मराठ्यांच्या तीन पिढ्या लढत राहिल्या. 'अरे पहातां काय? हिंदुपदपादशाहीचा दिवस अुजाडला' म्हणून गर्जत बाजीरावानें दिल्लीचे दरवाजे तोडले. भाअूनें दिल्लीचें तख्त फोडलें. भीमथडीचे घोडे सिंधूचें पाणी प्याले! विजयी भगवा झेंडा अटकेवर फडकावला!! असलें राष्ट्रीय अुत्थान अर्वाचीन हिंदु अितिहासांत महाराष्ट्राबाहेर कुठें दिसलें का? राष्ट्र निर्माण करणें तें हेंच. हेंच शिवाजीनें केलें; पण तें 'SIR' जदुनाथांना काय कळणार? "शूर मर्दांचा पोवाडा। शूर मर्दानें गावा!" मुर्दाडानें नव्हे!

प्रा. महाशयांनीं हिंदु समाजांतील जाति-अुपजातींचें अवडंबर माजवून तो अप्रस्तुत विषय ह्या वादांत घुसडून देण्याचें धाष्ट्यं करावें हें पाहून कोणासहि विषाद वाटेल; परंतु ह्या जाति-अुपजातींचें लोढणें गळ्यांत असतांनाच श्रीशिवाजीमहाराजांनीं प्रत्येक जाती आणि अुपजातीकडून देशाधर्माच्या नांवानें हिंदुपदपादशाहीसाटीं पिढ्यानुपिढ्या पराक्रम गाजविला तो काय राष्ट्रीय वृत्तीची प्रेरणा केल्यावांचून? शिवाजी राष्ट्रनिर्माता होता ह्याचें हेंच तर अुत्कृष्ट प्रत्यंतर आहे.

शिवरायानें केवळ राजकीय दृष्ट्याच आपल्या राष्ट्राचें पुनुरुज्जीवन केलें असें नाहीं, तर सामाजिक अुदारता दाखवून बदलत्या काळाप्रमाणें रूढीला बदलून आपली परंपरा अविकृत ठेवण्याची जी तत्परता दाखविली ती पाहून आजच्या सुधारकाला सुद्धां खालीं मान घालावी लागेल. बजाजी निंबाळकरासारखा अभिजात सरदार कांहीं लांछुचीला, कांहीं छळाला बळी पडून मुसलमान झाला असतां हिंदु धर्माच्या वर्धिष्णु, सर्वसंग्राहक व सर्वपाचक स्वरूपाकडे लक्ष्य देअून शिवाजीनें आज अजूनहि ज्या नांवाला कांहीं अतिशहाणे दचकतात, ती शुद्धीची प्रथा सक्रिय सुरू केली. बजाजी निंबाळकरास शुद्ध केलें; अितकेंच नव्हे तर त्या कुळांत स्वतःच्या कुळांतील मुलगी देअून त्याला हिंदु समाजांत पचवून टाकलें. त्याचप्रमाणें नेताजी पालकर ह्यालाहि महाराजांनीं शुद्ध करून पुनरपि हिंदु करून घेतलें होतें. अशा रीतीनें त्यांनीं हिंदुसंघटन व शुद्धि ह्या दोन अमूल्य संजीवनी त्याहि वेळेला अुपयोगांत आणल्या होत्या.

ज्याप्रमाणें राजकीय आणि सामाजिक अुत्थानाला शिवाजीनें चैतन्य दिलें होतें, त्याचप्रमाणें राष्ट्राला प्राणाप्रमाणें असलेलें वाङ्मयहि त्यांनीं अुत्तेजित केलें होतें. त्या वेळीं अुर्दू भाषेनें मराठी भाषेला जवळजवळ खग्रास ग्रहण लावीत आणलें होतें आणि जर शिवाजीनें भाषाशुध्दीचा प्रयत्न करून मराठी भाषेला संस्कृतांतून नवजीवन दिलें नसतें, तर आज मराठी भाषा कुठल्या कुठें विकृत झाली असती. परंतु त्यांनीं 'राज्यव्यवहारकोश' करवून आणि अुर्दू शब्द काढून टाकण्याची प्रवृत्ति वाढवून मराठी भाषेची मोठी सेवा केली. कवींना, ग्रंथकारांना अुत्तेजन देणें हीं राष्ट्रोद्धाराचींच कामें समजून शिवरायांनीं

तींहि पार पाडलीं. भूषण ह्या नांवाचा अुत्तर हिंदुस्थानचा सुप्रसिद्ध राष्ट्रीय कवि शिवाजीनें कांहीं वर्षे आपल्या आश्रयास ठेवला होता व त्याच्याकडून स्वतःच्या चरित्रावर सुंदर ग्रंथ सिद्ध करविला होता. त्याचप्रमाणें पंडित परमानंदाचें, गागाभट्टांचें आणि अनेक संस्कृत पंडितांचें स्वागत करून त्यांना यथान्याय व यथायोग्य आश्रय देअून गुणिजनांना आणि विद्वानांना आणि संस्कृत विद्येला अुत्तेजन दिलें.

मनुष्याचा अुत्सवप्रिय असलेला स्वभाव जाणून शिवरायानें गत-स्वातंत्र्याचें पुनरुज्जीवन नि हिंदुपदपादशाहीचें पुण्याहवाचन रायगडच्या पुण्यभूमीवर सिंहासनारोहणाचा समारंभ घडवून आणून केलें. अनेक शतकें-पर्यंत हिंदुस्थानच्या दैवीं, अुर्मी असलेलीं हिंदु सिंहासनें खचून गेलेली पहाण्याचें होतें. राजमुकुट हिंदूंच्या हातांत येत होते; परंतु ते परक्यांच्या मस्तकाला भूषित करण्याकरितां काय ते! छत्रचामरें ते पहात होते; परंतु तीं स्वतःच्या हातांनीं परक्यांच्या मस्तकांवर ढाळावीं लागत होतीं! आणि हाय! हें असें हृदयविदारक दृश्य अेक नव्हे, दोन नव्हे, सतत पांचशें वर्षे हिंदु जातीच्या ललाटीं लिहिलें होतें; परंतु शेवटीं शिवाजीनें मनु पालटविला. त्यानें हिंदु जातीच्या अितिहासांतील आणखी अेक अद्भुत रोमहर्षण प्रसंग गागाभट्टाच्या हस्तें स्वतःला विधियुक्त राज्याभिषेक करवून घेअून घडवून आणला.

धन्य तो दिवस, कीं ज्या दिवशीं शिवनेरीच्या पडक्या दुर्गांत जन्मास आलेलें, तोरणागडावर अडखळणारें, अेक यःकश्चित् भासलें जाणारें अुनाड पोर आखिल हिंदु राज्याचें स्वामी झालें. हिंदु जातीचें भाग्य पुनरपि अुदयाला आलें. हिंदु हें नांव जगांत जिवंत अुरलें.

तो धन्य दिवस हाच!—हिंदुपदपादशाह शिवछत्रपतींना आज राज्या-भिषेक होत आहे! या! पुण्यसरितांनो, आपल्या पवित्र जलांनीं आपलीं पात्रें भरभरून रायगडच्या राजवाड्याकडे या! आणि या हिंदु छत्रपतीवर राज्या-भिषेक करा! पश्चिम समुद्र नि पूर्व समुद्र हे तुझे दोन्ही बाहु अुभारून हे हिंदुमहासागरा, तुझ्या कोषागारांतील अशेष रत्नामोत्यांचीं अुपायनें ह्या हिंदुपदपादशहाच्या चरणांवर अर्पण कर!

ह्या अितिहास घडविणाऱ्या दिवसाला आज ठीक तीनशें वर्षें झालीं आणि या तीनशें वर्षांच्या अवधीनंतर हें हिंदुस्थान ह्या राष्ट्रीराला अुचित असा आपला कृतज्ञतेचा करभार सादर करीत आहे. त्या थोरामोठ्याच्या करभारांत हा माझाहि कृतज्ञ पुरस्कार शिवभूपते ! तूं स्वीकार आणि अितकेंच 'पसायदान' दे कीं, तुझी दिव्यस्फूर्ति आम्हां सांप्रत हतबल बनलेल्या हिंदु जातीच्या अंगांत संचरित व्हावी आणि तूं तीनशें वर्षांपूर्वी हिंदु राष्ट्राचें, हिंदु धर्माचें आणि हिंदु जातीचें जसें पुनरुज्जीवन केलेंस तसेंच आजहि करावयासाठीं तुझ्याप्रमाणें आम्हांलाहि सामर्थ्य यावें ! !

---

— २ —

केमालपाशानें केलेलें

‘ केसरी ’
२–३–१९३४

# तुर्कस्थानांतून अरबी संस्कृतीचें अुच्चाटण

## ( पूर्वार्ध )

१९१४ च्या जर्मन महायुद्धानंतर युरोपांत आणि पूर्व आशियांत जीं अनेक नवीन राष्ट्रें अुदय पावलीं किंवा जीं नांवानें जुनींच राहिलीं तरी कात टाकलेल्या नागाप्रमाणें आपलें जीर्ण वार्धक्य टाकून नवीन जीवनानें मुसमुसूं लागलीं त्यांमध्यें पूर्व तुर्कस्थानचें राष्ट्र हेंहि अेक गणलें गेलें पाहिजे. त्या राष्ट्राच्या अुदयाचा अितिहास अभ्यसनीय आहेच; पण त्यांतहि आपल्या हिंदुस्थानच्या संक्रमणावस्थेंत, तरुण तुर्कांच्या नेतृत्वाखालीं आणि कर्तृत्वाखालीं पूर्व तुर्कस्थानांत तुर्कांचें हें जें प्रबळ राष्ट्र प्रगतीच्या घोडदौडेंत आज अकस्मात् पुढें सरसावलें आहे त्याचा अितिहास आज हिंदी लोकांस विशेषच बोधपर होणारा आहे. त्यांतल्या त्यांत विशेषतः हिंदी मुसलमानांना तर या विषयाचें अत्यंत महत्त्व वाटलें पाहिजे. कारण हिंदी मुसलमानांचा फार मोठा भाग अजूनहि अरबी संस्कृति हाच स्वतःचा अपरिवर्तनीय धर्म म्हणून समजतो. अितकेंच नव्हे तर ती हिंदु समाजावर लादून तिच्या भाषालिपि, निर्बंध ( कायदा ) अित्यादींच्या साच्यांत अुभ्या भारतीय राष्ट्राचीच घडण बनविण्याचा अनावर मोह त्यांस अजूनहि होत आहे. अशा स्थितींत ही जीर्ण संस्कृति स्वतःच्या प्रगतीच्या मार्गांत अेक धोंड होअून राहिली आहे, असें म्हणणाऱ्या तुर्कांच्या मतांत आणि अनुभवांत जर तथ्य असेल आणि तें समजावून न घेतां जर हिंदी मुसलमान तीसच यापुढें चिकटून रहाण्याचा दुराग्रह धरतील तर त्यांचें आणि त्यांच्याबरोबरीनें त्यांच्यामुळें साऱ्या भारतीय राष्ट्राचें अहित झाल्यावांचून रहाणार नाहीं. बरें, हें मत आणि हा अनुभव कोणी हिंदु वा गैर-मुस्लीम समाज पुरस्कारीत नसून हिंदी मुसल-

मानांतील बहुजनसमाज अजूनहि ज्या तुर्कस्थानास अरबी संस्कृतीचा — म्हणजेच मुसलमानी संस्कृतीचा — पुरोध्वज, आधारस्तंभ, संरक्षक आणि सम्राट् समजतात, तो तुर्कस्थानच तें मत पुरस्कारीत आहे! तुर्कस्थानानें महायुद्धानंतर खिलाफतीचें अुच्चाटन केल्यानंतरहि हिंदी मुसलमानांतील बहुजनसमाजाची तुर्कस्थान हा मुस्लीम समाजाचा कट्टर अभिमानी आहे ही जुनी समजूत जशीची तशीच राहिलेली आहे. म्हणून त्यांनीं तुर्कस्थानांत अलीकडे होत असलेल्या चळवळीकडे लक्ष पोहोंचविल्यास आजच्या जगताच्या प्रगतीच्या स्पर्धेत अरबी संस्कृति किती टिकाव धरूं शकेल याचा फेरविचार करण्याची आवश्यकता त्यांनाहि भासूं लागेल.

## अरबी संस्कृतीची पूर्वकालीन अुपयुक्तता

आजच्या प्रगमनशील परिस्थितींत अरब संस्कृति कितीहि मागासलेली दिसली तरी हें विसरतां कामा नये कीं, यापूर्वी अेकदां जगाच्या फार मोठ्या भागांतील मरणासन्न समाजांत त्या संस्कृतीनें नवचैतन्याचें वारें संचारविलें होतें. मानवी प्रगतींत अेका काळीं नवतत्त्वें, नवधर्म, नवशिल्प यांची बहुमोल भर तिनेंहि टाकली होती. तिचा अुगम महंमद पैगंबरांनीं मुस्लीम धर्माची मुहूर्तमेढ हजार–बाराशें वर्षांपूर्वी जेव्हां रोविली तेव्हां झाला. ज्या दिवशीं महंमद पैगंबरांनीं कुराण शरिफाचें पहिलें 'आयत'—पहिला मंत्र—अुच्चारला आणि तरवार अशी पहिल्यानेंच अुपसली त्या दिवसापासून अेका शंभर–दीडशें वर्षांचे आंत तिकडे स्पेन तो अिकडे सिंधूपर्यंत ज्या संस्कृतींतील अंतर्गूढ आवेशानें व शक्तीनें अर्ध्या जगताचें रूप बदलून टाकलें, जिच्या विजयाच्या अप्रतिहत वेगास स्पेनची सामुद्रधुनी, अिराणचा अग्नि, सिंधूची अटक, चीनची भिंत वा हिमालयाचीं शिखरें हीं अडवूं शकलीं नाहींत, जिनें आपल्या धर्माची, भाषेची, लिपीची, शिल्पाची, शास्त्राची राजमुद्रा ठोकून खंडेंचीं खंडें अंकित करून टाकलीं, त्या अरब संस्कृतींत तिच्याशीं टक्कर देअूं आलेल्या त्या काळच्या अनेक जीर्णशीर्ण संस्कृतींपेक्षां जें अेकंदरींत ह्या काळच्या जगतांत नुसतें जगण्यासच नव्हे तर ह्या जगास जिंकण्यासहि समर्थतर आणि योग्यतर ठरेल असें कांहीं तरी असामान्य श्रेष्ठत्व, कांहीं तरी नवें जीवनतत्त्व, होतेंच होतें हें निर्विवाद आहे.

## संस्कृतीच्या अुन्नतीच्या मर्यादा

पण अखंड विकासशील निसर्ग आणि अनावर काळ ह्यांना तर आळा घालून घेणें केव्हांहि परवडत नाहीं, सहन होत नाहीं. साध्या कसरीपासून साध्या पुस्तकास त्याची नवीन प्रत करून किंवा सुधारलेली आवृत्ति काढून अेक वेळ चिरकाल सुरक्षित ठेवतां येअील; पण काळाच्या कसरीपासून अपरिवर्तनीय अशा धर्मग्रंथाचें सर्वकाळ रक्षण करणें प्रत्यक्ष देवदूतांसहि शक्य होत नाहीं. कारण काळाची कसर त्या अपरिवर्तनीय धर्मग्रंथाचीं नुसतीं पानेंच खात नाहीं तर त्यांतील अर्थासच कुरतडून त्याची नुसती चाळण करून सोडते ! त्यामुळें त्याची नवीन प्रत केली तरी ती निरर्थक होते. आणि अपरिवर्तनीय धर्मग्रंथाची सुधारून वाढविलेली आवृत्ति काढणें तर मुळांतच असंभवनीय असतें, निषिद्ध असतें, तें वदतोव्याघातच असतें ! अशा कारणानें अरबी संस्कृतीची अर्वाचीन युरोपियन संस्कृतीशीं गांठ पडतांच तिची दुर्दशा न अुडणें हें असंभवनीय होतें. अरब संस्कृति कोणत्याहि अपरिवर्तनीय धर्मग्रंथांत डांबून पडलेल्या संस्कृतीप्रमाणें अेक स्वतंत्र, धार्मिक, स्थितिशील संस्कृति; पण अर्वाचीन संस्कृति जशी परिस्थिति पालटेल तसे पवित्रे बदलण्यास सर्वथैव स्वतंत्र असलेली शास्त्रीय, वैज्ञानिक (Scientific) यंत्रयुगाच्या अभ्युदयासरशीं बाष्पविद्युत्रेडियोंना आपल्या लगामीं आणून अुंच आकाशांत चंद्रावर विमानांची स्वारी करूं पहाणारी आणि सखोल महासागराच्या तळाशीं बसलेल्या अरण्यांचे प्रकाशलेख घेणारी, काळाच्या हातांत हात घालून धांवणारी गतिशील संस्कृति ! त्यांची टक्कर जुंपतांच ती अरबी—ती मुस्लीम संस्कृति—त्या युरोपियन संस्कृतीसमोर तशीच हतबुद्ध व हतवीर्य होअून गेली कीं, जशा अरबी संस्कृतीच्या पहिल्या आवेशासमोर, तिच्याहून टाकाअू असलेल्या त्या दहा-पंधराशें वर्षांपूर्वीच्या जीर्णशीर्ण संस्कृति आणि सत्ता हतप्रभ व हतवीर्य होअून गेल्या !

## तरुण तुर्कांचें बंड

ही स्थिति पाहतांच साऱ्या मुसलमानी राष्ट्रांत जर कोणीं पहिल्यानें त्या अपरिवर्तनीय मुस्लीम संस्कृतीच्या शृंखला तोडून युरोपियन राष्ट्रांच्या वैज्ञानिक संस्कृतीचा अवलंब करण्याचें साहस केलें असेल तर तें ' तरुण तुर्क '

नांवाच्या या शतकाचे आरंभीं अुदय पावलेल्या संस्थेनेंच होय. अनवरपाशा, केमालपाशाप्रभृति या तरुण तुर्क संस्थेच्या पुढाऱ्यांचें शिक्षण जर्मनी, फ्रान्स, अिंग्लंड अित्यादि देशांतच झालेलें असल्यामुळें युरोपांतील राष्ट्रवाद, राज्यघटना, शास्त्रें, शासनें, यांत्रिक, सैनिक, सामाजिक क्रांति यांचा अवलंब केल्यावांचून आणि त्यांचे मार्गांत आड येणाऱ्या जुन्यापुराण्या भाबडेपणास सोडल्यावांचून तुर्कस्थानास स्वतंत्र आणि समर्थ राष्ट्र म्हणून जगणें अशक्य आहे ही गोष्ट त्यांच्या मनांत पक्की बिंबली आणि तुर्कस्थानांत आज अरबी संस्कृतीचें अुच्चाटन करण्याचा जो भगीरथ प्रयत्न चाललेला आहे तो त्याच तरुण तुर्कांच्या ह्या प्रगमनशील ब्रीदाचा आणि प्रतिज्ञेचा परिणाम आहे. तुर्क राष्ट्राच्या अुत्कर्षास जी जी ज्या ज्या परिस्थितींत अवश्य असेल ती ती सुधारणा तत्काळ घडवून आणावयाची, मग तिला अपरिवर्तनीय धर्मग्रंथांत आधार सांपडो वा न सांपडो हा तरुण तुर्कांचा जो बाणा होता तो आज साऱ्या तुर्कस्थानचाच बाणा झाला आहे.

तरीहि हें ध्यानांत ठेविलें पाहिजे कीं, आजच्या परिस्थितीशीं टक्कर देण्यास अरबी संस्कृति असमर्थ आहे म्हणूनच कांहीं तुर्क तिच्याविरुध्द अितके खवळलेले नाहींत, तर त्या राष्ट्रांत चाललेल्या या सामाजिक क्रांतीच्या मुळाशीं दुसरेंहि अेक अैतिहासिक कारण आहे. अरब संस्कृतीविरुध्द अुभारलेल्या या तुर्की बंडास अरब संस्कृति ही माझी संस्कृति नव्हे असा तुर्कस्थानच्या राष्ट्रवादी पक्षांत संचरलेला जात्यभिमानी आवेशहि प्रोत्साहीत आहे. केमालपाशा हा हजारों हिंदी मुसलमानांस अजूनहि "धर्मवीर" "गाझी" वाटतो. ज्या तुर्कांचा खलिफा आणि सुलतान म्हणजेच मुस्लीम धर्माचा आणि सत्तेचा जगद्गुरु आणि जगत्सम्राट्, म्हणून शेकडों वर्षें ते अैकत आले आणि त्यास संरक्षणाची देवापाशीं प्रार्थना करीत आले; त्या हिंदी मुसलमानांस तेच तुर्क लोक त्याच मुस्लीम संस्कृतीस "अरबी" म्हणून परकी समजूं लागले आहेत, ही गोष्ट अैकून मोठें आश्चर्य वाटतें. तें कोडें त्यास अुलगडत नाहीं. आजच्या अरबी संस्कृतीविरुध्द तुर्कांनीं असें चिडून कां जावें याचा वाचकांस अुलगडा होण्यासाठीं त्या बंडाच्या मुळाशीं असलेल्या ह्या दुसऱ्या कारणावर प्रकाश पाडण्यापुरता तुर्कांचा आणि अरबांचा पूर्वापार संबंध कसा आला आणि कसा वाढला याच्या वृत्तान्ताची किंचित् रूपरेषा येथें देणें भाग आहे.

# अरबी साम्राज्यांत तुर्कांचा प्रवेश

महंमद पैगंबर यांनीं अरबांमध्यें मुसलमानी धर्म आणि मुसलमानी राज्य स्थापिल्यामुळें त्यांच्या हातीं धर्मदंडाची आणि राजदंडाची दुहेरी सत्ता अेकत्रित झाली. मुसलमानी जगाचे तेच खलिफा आणि तेच सुलतान, तेच जगद्गुरु आणि जगत्सम्राट् होते. त्यांच्यामागें अबुबेकर, अुमर, अुस्मान आणि अली ह्या पहिल्या चार सत्ताधाऱ्यांच्या हातीं ती दुहेरी सत्ता तशीच चालत राहिली. पुढें ओमेयेड आणि फातिमाअिड वंशांच्या हक्कांचीं भांडणें लागून सुनी आणि शिया अशीं मुस्लीम जातीचीं दोन शकलें झालीं. प्रथम ओमेयेड व नंतर अबास, मनसूर, महादी आणि हरुन रशीद हे मोठे बलाढ्य खलिफा होअून गेले. अरेबियन नाअिट्सचे हेच नायक होते; पण पुढें सुनीशियांत आणि सुनीसुनींत राजसत्तेविषयीं अितकी भयंकर यादवी माजली कीं, त्या अरबी खलिफांस स्वतःचें अरब सैन्य ह्या धार्मिक आणि वांशिक पक्षभेदाच्या वादळांत सांपडून केव्हां कोण कोणाचा पक्ष घेअील याचा विश्वास वाटेनासा झाला. त्यामुळे ज्यांना वेतनाच्या रकमेवांचून दुसऱ्या कसल्याहि मुसलमानी धर्मवंशपंथ यांची लवलेश चाड नसे असे गैरमुस्लीम सैनिकच नोकरीस ठेवणें अरब खलिफांस बरें वाटूं लागलें. त्या संधीसच मुस्लीम सत्तेची लाट मध्य आशियांतील तुर्कस्थानच्या सीमेस भिडली होती. तेव्हां त्या तुर्क-तातेरांची कडवी लढवय्यी वृत्ति पाहून बगदादच्या खलिफांनीं त्यांचीच भरती आपल्या सैन्यांत करण्याचा सपाटा चालविला. धार्मिक बखेडे माजवून बंडें करण्यास सोकावलेल्या स्वतःच्या मुस्लीम अरबी सैन्यांपेक्षां वेतन दिलें कीं, सुनी असो शिया असो, सांगाल त्याची कत्तल करण्यास सिद्ध असणारें हें गैरमुस्लीम तुर्की सैन्यच खलिफा आपल्या अत्यंत विश्वासू कामावर नेमूं लागले. सन ८३३ त अबासी खलिफा मुतासिम हा गादीवर आल्यापासून तर त्यानें अरबी अधिकाऱ्यांस काढून बहुतेक मोठमोठ्या अधिकारांवर ह्या मुसलमान नसलेल्या तुर्कांनाच नेमण्याचा सपाटा चालविला. होतां होतां खलिफांच्या राजवाड्यांत देखील तुर्की सरदारांच्या शब्दावांचून पान हालेनासें झालें. या परस्थ आणि परधर्मीय तुर्कांनीं आपलें अरबी साम्राज्य ग्रासून टाकावें याचें अरब लोकांस मोठें वैषम्य वाटूं लागलें; पण अरबांची

आपसांतील यादवी अितकी चिरडीस गेली होती कीं, तुर्कांचा चढेलपणा त्यांस मुकाट्यानें सहन करीत राहणें भाग पडलें.

अि. स. ८६९ मध्यें तर तुर्कांनीं बगदादचा अरबी खलिफा मुतादि यास वेतन थकलें म्हणून गादीवरून ओढून फरकटत आणून रस्त्यांत फेकून दिलें, तुरुंगांत कोंबलें नि शेवटीं हालहाल करून ठार मारिलें! तेव्हांपासून खलिफाचे देहरक्षकच नव्हेत तर चालक नि पालकहि तुर्कच झाले. ते वाटेल त्यास खलिफा करीत, वाटेल त्यास काढून टाकीत. बगदादच्या सुनी अबासी वंशाचीच ही स्थिति झाली नाहीं तर तिकडे अिजिप्तमध्यें असलेल्या शियांच्या फातिमाअिड खलिफांचीहि तुर्कांनीं तीच गत करून सोडली. त्या अिजिप्तच्या अरब राज्यांतील तलाअी नांवाच्या बलाढ्य तुर्क सरदारानें तर स्वतःस 'खलिफाचा कर्ता' म्हणवून घेअून त्यांचें पालकत्व नेहमीं आपल्या पक्षाचे हातीं असावें म्हणून खलिफा अल्पवयी असला पाहिजे हा अलिखित दंडकच जणूं घालून दिला. मोठ्या वयाचा औरस पुत्रहि बाजूस सारून त्या वंशांतील कोणाचा तरी दूरचा अल्पवयी मुलगा आणून त्यास तो खलिफा करी. अरबी साम्राज्यास तुर्क आंतून असें पोखरीत असतांना बाहेरून त्याजवर

## जगज्जेत्या चेंगीझखानाची स्वारी

येअून वज्रपातासारखी आदळली! चेंगीझखान हाहि मुसलमान नव्हता. आपल्या अिकडे हिंदूस कोणाला 'खान' म्हणतांच आणि मुसलमानास कोणाला 'जगज्जेता' म्हणतांच तो मुसलमान असलाच पाहिजे असें वाटतें. आम्ही असे अनेक अनाडी मुसलमान पाहिले आहेत कीं, "शिकंदरखान" (अलेक्झंडर) हा मुसलमान नव्हता म्हटलें कीं ते चिडून जात! "मुसलमान नसता तर खुदा त्याला फत्ते कशी देता?" हा त्यांचा कोटिक्रम! तोच अरब लोकांचाहि कोटिक्रम असे! आणि मुसलमानांच्या अशाच बढायांनीं चिडून जाअून मुस्लीम नसलेल्या चेंगीझखानानें मुसलमानांचा नुसता फडशा पाडला. त्यानें बगदाद धुळीस मिळविलें, दमास्कसचा दम अुखडून टाकला, मशिदींचीं मैदानें केलीं, लक्षावधि मुसलमानांची कत्तल करून त्यांच्या कापलेल्या डोक्यांचे ढीग रचून त्यांच्यावर आरूढ होअून चेंगीझखानाचें डोकें चांदण्यांत विचार करीत बसे! मुसलमान नसलेल्यासहि देव फत्ते देतो अशी

अरबांची निश्चिति पटावी अितका त्या चेंगीझनें त्यांचा भयंकर फडशा पाडला. मुसलमान तवारिखकार त्यास अजूनहि ‘ देवाचा शाप ! ’, ‘ देवाचा प्रकोप ! ’ म्हणून संबोधतात. खरें पहातां अरब साम्राज्याचा अिथेंच अंत झाला !

## तुर्की सुलतानांचा अुदय

चेंगीझखानाची ही जग हादरून सोडणारी प्रलयंकर वावटळ शमून मध्य आशिया खंड पुनः दिसूं लागलें तेव्हां पाहातात तों खलिफांचा वंश म्हणून सांपडेना ! शेवटीं अिजिप्तच्या प्रबळतर तुर्क सेनानीनें कुठून तरी त्या वंशांतला अेक पुरुष शोधून आणला आणि त्यास धर्मदंडाच्या अधिकारापुरता खलिफा करून राजदंड अुघडपणें स्वतःचे हातांत घेतला. त्या वेळेपासून तुर्क सुलतान झाले, सम्राट् झाले आणि अरबांच्या हातीं निर्माल्यवत् झालेली खिलाफती ( धर्मगुरुपण ) तेवढी राहिली ; परंतु जो स्वतंत्र आणि सत्ताधीश तोच खलिफा होअूं शकतो असा मुसलमानी धर्मशास्त्राचा दंडक असल्यानें शेवटीं मुसलमानी जगत् तुर्की सुलतानानें खलिफाहि व्हावें या गोष्टीस अनुकूल होत चाललें आणि अंतीं तुर्कस्थानचा पराक्रमी सुलतान सेलीम ह्यानें अरबांचे हातून तो धर्मदंडहि काढून आपल्या हातीं घेतला. तेव्हांपासून तुर्कच सुलतान नि खलिफाहि झाले. अरबांचीं प्रख्यात क्षेत्रें मक्का आणि मादिना तुर्कांनीं घेतलीं. आपली सत्ता चालविण्यास मुसलमानी धर्म आणि संस्कृति अुपयोगी पडत होती म्हणून तुर्की सुलतानांनीं मुस्लीम धर्म नि अरबी संस्कृति स्वीकारली ; पण ह्या लेखांत पूर्वी सांगितल्याप्रमाणें अर्वाचीन युरोपशीं टक्कर देण्यास ती अपुरी पडते असें पहातांच त्यांनीं तिला झुगारून देण्यासहि कंबर कसली. कारण तिचें खरें महत्त्व असें त्यांस केव्हांच वाटत नव्हतें.

आज तुर्कस्थानांत अरब संस्कृतीचें अुच्चाटन करण्याची केमालपाशाच्या नेतृत्वाखालीं जी प्रबळ अुठावणी झाली आहे तिचीं दोन मुख्य कारणें आणि अैतिहासिक पूर्वपीठिका ह्या पूर्वार्धाच्या लेखांत अशी रूपरेखिल्यावर आतां अुत्तरार्धांत धर्मभाषालिपिनिर्बंधजनरीतिनीतिप्रभृति प्रकरणीं तुर्कांनीं गेल्या दहा वर्षांत कशी क्रांति घडवून आणली आहे त्याची अुद्बोधक अशी प्रकरणवार माहिती देण्याचा विचार आहे.

---

केमालपाशानें केलेलें

‘ केसरी ’
१–६–१९३४

# तुर्कस्थानांतून अरबी संस्कृतीचें अुच्चाटण

## ( अुत्तरार्ध )

या लेखाच्या पूर्वार्धांत अरब संस्कृतीचें वर्चस्व तुर्क लोकांस नको होण्याचें अेक भूतकालीन आणि अेक भविष्यकालीन अशीं दोन मुख्य कारणें सांगितलीं. अरबांशीं तुर्कांच्या आणि तुर्कांशीं अरबांच्या भूतकालापासून चालत आलेल्या अैतिहासिक तेढीमुळें त्या अरबांच्या सांस्कृतिक दास्याचा तुर्कांना आधींच आलेला तिटकारा आणि त्यांतहि अपरिवर्तनीय धर्मग्रंथांशीं ती संस्कृति नित्याची जखडली गेल्यामुळें प्रगतिशील भविष्यकालाशीं तोंड देण्यासाठीं ज्या युरोपियन वैज्ञानिक सुधारणा अवश्य होत्या त्यांना ह्या धार्मिक अरबी प्रवृत्तींचा होणारा विरोध ह्या दोन मुख्य कारणांमुळें तरुण तुर्कांनीं अरबी संस्कृतीवर चढाअी करण्याचा ठाम निश्चय केला. अितकी ह्या विषयाची पूर्वपीठिका त्या पूर्वार्धांत दिल्यानंतर आतां ह्या अुत्तरार्धांत त्या चढाओढीचें स्फुट वर्णन देण्याचें योजिलें आहे.

जर्मन महायुद्धाचे अंतीं सन १९१९ च्या वर्षी तुर्कांच्या झालेल्या पराभवाचा पुरा पुरा लाभ घेअून व्हर्सेलच्या संधींत तुर्कांच्या साम्राज्यास युरोपियन राष्ट्रांनीं आपसांत वांटून घेतलें. तुर्की स्वातंत्र्य पुरतें गतप्राण होण्याचे आधींच केमालपाशानें आपल्या खड्गाच्या सुअीनें त्यांत पराक्रमाची संजीवनी संचरविली, देखत देखत कॉन्स्टॅन्टिनोपलपासून स्मर्नापर्यंतच्या विस्तीर्ण रणांगणांत ग्रीकांची रग जिरविली आणि नवशक्तीनें मुसमुसलेलें तुर्कांचें स्वतंत्र राष्ट्र पुनः आपल्या पायांवर अुभें राहून, अढळ ठाण मांडून, तुझ्या व्हर्सेलच्या संधीस मी भीक घालीत नाहीं जा, म्हणून युरोपास

आव्हानूं लागलें. या लेखाचा हेतु तुर्कस्थानांतील या राज्यक्रान्तीचें विवरण देण्याचा नसल्यामुळें ज्या सांस्कृतिक क्रान्तीचें वर्णन या लेखांत द्यावयाचें आहे ती या राज्यक्रान्तीमुळें शक्य झाली आणि ती या राज्यक्रान्तीचाच पहिला अपरिहार्य परिणाम होता हा कार्यकारणभाव दाखविण्यापुरतेंच तिला असें नुसतें निर्देशून तें पुनरुज्जीवित तुर्की राष्ट्र चिरस्थायी करण्यास्तव केमालपाशानें पहिल्या धडाक्यासच तुर्कस्थानांतून खिलाफतीची हकालपट्टी का व कशी केली तें पाहूं!

## अरबी खिलाफतीचें अुच्चाटण

जर्मन महायुद्धाच्या प्राणसंकटांत तुर्क सांपडले असतां त्यांच्या साम्राज्यांतून फुटून अरबांनीं गैरमुस्लीम ख्रिश्चन राष्ट्रांचे बाजूनें बंड केलें होतें. या अरबांच्या विश्वासघातानें तुर्क चवताळून गेले. तरुण तुर्कांच्या अुदयानंतरहि महायुद्धापावेतों त्यांनीं ह्या खिलाफत संस्थेचा हत्ती जो पोसला होता तो त्या खलिफापदाचें त्यांस धार्मिक ममत्व वाटत होतें म्हणून नसून अरबप्रभृति मुसलमानांना ह्या धार्मिक पीठाचे अधिकारी म्हणून तुर्की साम्राज्याचें ममत्व वाटेल व त्यांचें पाठबळ तुर्क राष्ट्रास मिळत राहील या राष्ट्रीय लाभासाठींच होय; परंतु अरबांनींच त्यांच्या या खलिफास ठोकरून दिल्यामुळें आणि मिसर, अिराण, अफगाणिस्थानप्रभृति कोणत्याहि मुसलमानी राष्ट्रांनीं तुर्क आपला खलिफा, त्यानें जिहाद–धर्मयुद्ध पुकारलें, आपणांस त्याच्या झेंड्याखालीं जाअून त्याच्या शत्रूंशीं लढलेंच पाहिजे अशा धार्मिक भावनेनें तुर्कांस म्हणण्यासारखें कोणाचेंहि रणसहाय्य दिलें नसल्यानें खिलाफतीची संस्था ठेवली असतां मुसलमानांच्या शक्तीचें केंद्रीकरण आपल्या तुर्की राष्ट्रध्वजाखालीं करतां येअील ही अपेक्षा फोल ठरली. ह्याला न सांगितला तरी चालेल असा अेकच अपवाद काय तो आढळला. तो म्हणजे ज्यांना स्वतःचें राष्ट्रच नव्हतें अशा हिंदी मुसलमानांचा आणि गांधीवादी हिंदूंचा! ह्या सज्जनांना तुर्की खिलाफतीची चिंता तुर्कांपेक्षांहि अधिक ममत्वानें विव्हळवूं लागली; हिंदी खिलाफत मंडळानें ती कोलमडणारी तुर्की खिलाफत सांवरून धरण्यासाठीं आपल्या गवताच्या काडीची कुबडीदेखील केमालपाशाच्या हातांत दिली; पण तिचा टेकू घेअून हिंदी

मुसलमान नांदत होते तशा सुस्थितींत नांदण्याचें केमालपाशाच्या दैवीं नसल्यानें त्या कुबडीच्या साहाय्याची देखील वास्तपुस्त करण्याची दुर्बुद्धि त्याला आठवली नाहीं त्यास कोणाचा काय अुपाय? त्याचा ठाम सिद्धान्त ठरला कीं, ह्या पॅनअिस्लामिझम्‌च्या खुळानें तुर्की राष्ट्राचा यापुढें लवलेश लाभ होण्याचा संभव राहिला नाहीं!

अुलट ती पॅनअिस्लामिझम् तुर्कांच्या प्रगतीचे मार्गांत दुर्लंघ्य विघ्नें मात्र आणण्यास कारणीभूत होत राहणारी आहे अशी केमालपाशानें अुघड अुघड घोषणा केली. कारण तुर्कस्थानचा सुलतान हाच जोंवर मुसलमानी धर्माचा खलिफाहि म्हणून घेअील तोंवर मुसलमानांच्या धर्मशास्त्रांतील नीतिनिर्बंध होहि त्यास पाळावेच लागणार. हजार-दीड हजार वर्षांपूर्वी अरबस्थानच्या विशिष्ट परिस्थितींत जे लागू पडले ते लग्न, वारसा, स्त्रीदाससंततिविषयक अधिकार, दंडविधान, राजनीति, तत्त्वज्ञान प्रभृति व्यक्तिजीवनांतील आणि राष्ट्रीय जीवनांतील झाडून साऱ्या प्रकरणांचे कुराणांत सांगितलेले निर्बंध आणि नियम आजच्या मनूंतहि तंतोतंत लागू केलेच पाहिजेत; नव्हे ते त्रिकालींहि बदलतां कामा नयेत, हें तत्त्व स्वीकारणें म्हणजे खिलाफत चालू ठेवणें होतें!

अितकेंच नव्हे तर तुर्की जातीवर अरब जातीहून नीचतर असण्याचा छाप त्या खिलाफतीच्या धर्मदंडानें नित्याचा मारलेला असावा याचेंहि तरुण तुर्कांस मोठें वैषम्य वाटत होतें. कारण अिस्लामी धर्मशास्त्राप्रमाणें पैगंबराच्या अगदीं कुळांतील नसले तरी त्याचा जन्म ज्या पोटजातींत झाला त्या कोरेश वर्गांतील रक्तबीज ज्यांत असेल तोच खलिफा होअूं शके. ती पैगंबराच्या जन्मानें धन्य झालेली जात भक्तिमान अनुयायास साहजिकच अुच्चतम आणि धर्मगुरुत्वधारणाची अनन्य अधिकारी अशी वाटे. त्या धार्मिक समजुतीस मान तुकविल्यावांचून तुर्कांचे पहिले प्रबळतम सुलतानहि खलिफापदास तोंवर योग्य समजले गेले नव्हते कीं, जोंवर त्यांच्या रक्तांत, निदान मातेच्या बाजूनें तरी, अरबी खलिफाच्या श्रेष्ठ रक्ताचा अंश अुतरलेला नव्हता. यामुळें तुर्की सुलतानांनीं स्वतःच पदच्युत केलेल्या दुर्बल खलिफांचीहि मनधरणी करून त्यांच्या कन्यकांशीं विवाह करण्याची तुर्की

सुलतानांना वरचेवर धडपड करावी लागे. तुर्की सुलतानांच्या अंगांतील तुर्की रक्ताच्या पराक्रमी तेजामुळें ते खलिफापदाचें पावित्र्य पावत नसून त्यांच्यांतील जन्मजात अुच्चतर व शुद्धतर अरबी रक्तच काय तें त्या गौरवाचें अधिकारी होतें असाच ह्या धार्मिक समजुतीचा गर्भितार्थ होता आणि तोच तुर्कांच्या जातीची गर्भित निंदा होती. आपल्या जातीय रक्तबीजाला अरब रक्तबीजाहून हीनतर लेखण्याअितके तरुण तुर्क मूर्खहि नसल्यामुळें किंवा मुर्दाडहि नसल्यामुळें त्या मानहानीनेंच जी स्वीकारली जाअू शके, त्या खलिफाच्या पदवीसच धिक्कारून देण्यास ते सिध्द झाले.

अशा रीतीनें जिच्यापासून यापुढें लाभ तर होणारा नव्हता, हानि मात्र निश्चित होती व जी स्वजातीय रक्ताचा अुपमर्द करणाऱ्या तत्त्वावरच अधिष्ठित होती ती ही खिलाफत संस्था अुखडण्याची संधीहि तरुण तुर्कांस आतां आली ! वर सांगितल्याप्रमाणें सन १९१४ चे महायुद्धाचे अंतीं स्मर्ना व कॉन्स्टँटिनोपल नगरांतून ग्रीक सैन्यास पिटाळून तुर्क राष्ट्र पुनः रणविजयी होतांच त्या विजयानें फुरफुरणाऱ्या आपल्या घोड्यास टांच देत व हातांत रिव्हॉल्व्हर रोखीत केमालपाशा जो निघाला तो थेट खलिफाच्या त्या दुबळ्या राजसभेंत जाअून थडकला. सोंगट्यांचा पट अुधळावा तशी त्यानें ती राजसभा अुधळून दिली, खलिफास गादीवरून खालीं आणलें आणि तुर्कस्थानांतून खिलाफतीस आमूलाग्र अुच्चाटून, पदभ्रष्ट खलिफास राष्ट्रांतून हांकून दिलें !

जो खलिफा तोच सुलतान. त्या खलिफास पदभ्रष्ट करण्यांतच केमालनें त्या सुलतानालाहि पदच्युत केलें. खलिफाशाही आणि सुलतानशाही दोनहि जीर्णशीर्ण संस्था अेका घावासरशी गतप्राण झाल्या. धर्मसत्ताक राजसत्तेचा अंत होअून Theocracy संपून, तुर्कस्थानांत बुद्धिनिष्ठ लोकसत्तेची स्थापना झाली, आणि तीच अपरिवर्तनीय अशा अरबी धर्मसंस्कृतीच्या अितिश्रीची अथश्रीहि होती!

## अरबी धर्मनिर्बंधांचें अुच्चाटण

महायुद्धांत तुर्कस्थानाच्या शत्रूंचे हातांत हात घालून तुर्की सत्तेस अरबांनीं झुगारलें होतेंच. त्यांनीं तर्कांची राजकीय सत्ता झुगारली तर

तुर्कांनीं त्यांची धर्मसत्ता झुगारून दिली. त्यांच्यांत आतां कोणी कोणाचा राहिला नव्हता. खलिफाचें अुच्चाटण करतांक्षणींच धर्माची राजकारणांतून साफ अुचलबांगडी झाली. तोंवर तुर्कांचे सारे व्यवहार कुराणांतील पुरातन अरबी सांच्यांत ढाळलेल्या आणि अपरिवर्तनीय मानलेल्या धर्मनिर्बंधानुरूप होत आले होते; पण तरुण तुर्कांनीं पहिल्या धडाक्यासच धर्मनिर्बंध हा समास सोडविण्याचे भरीस न पडतां तो मुळीं तोडूनच टाकला. धर्म निराळा, निर्बंध ( कायदा ) निराळा. अेक शब्दनिष्ठ श्रद्धेचा प्रांत, अेक प्रत्यक्षनिष्ठ प्रयोगाचा. त्याचा विषय परलोक व याचा अिहलोक. ‘ अतः प्रत्यक्षमार्गेण व्यवहारविधिं नयेत् ’ ह्या तत्त्वाची घोषणा करून तरुण तुर्कांनीं लोकसभेच्या पहिल्यावहिल्या बैठकींतच व्यवहारविषयक ते ते सारे धर्मनिर्बंध रद्द करून टाकले. स्वित्झर्लंडमधील मोठेमोठे निर्बंधपंडित ( कायदेपंडित ) आणून त्या देशाचें पौरविधान ( Civil Law ) तुर्क राष्ट्रास लागू केलें. अेकाहि मुल्लास वा मौलवीस धर्मशास्त्र या सुधारणेस अनुकूल कीं प्रतिकूल तें विचारण्यांत आलें नाहीं. अेका दिवसांत लोकसभेंत हें पौरविधान संमत झालें. छेदकवार चर्चा तर दूरच. पण ग्रंथवार चर्चेंतदेखील कोणीं वेळ गमावला नाहीं. महिनोगणति ये-जा होअून आधींच ठलरेल्या विवाहाच्या औपचारिक वाङ्निश्चयाचें नाटक जसें घटकेंत घडून येतें तसें त्याचें अेका दिवसांत अेक युग अुलटून गेलें. त्याच्या दुसऱ्याच दिवशीं तें नवें पौरविधान वर्तण्यांतहि आल्याची द्वाही फिरली. अिस्लामी लग्नप्रथा रद्द; अिस्लामी वारसाप्रथा रद्द; अिस्लामी बहुपत्नीत्व रद्द; धार्मिक न्यायशासन रद्द. पौरविधान स्वित्झर्लंडमधील लागू केलें तर दंडविधान ( Criminal Law ) अिटलींतील निर्बंधपंडित आणून त्यांच्याकडून बनवून घेतलें. चोरी, दरवडे, हत्या अित्यादि साहसांना आणि अपराधांना कुराणांतील अरबी धर्मकल्पनानुगामी पुरातन शासनें न देतां प्रागतिक कांटेकोरपणास साजेल असा न्यायनिवाड्याचा आणि दंडशिक्षेचा प्रघात चालू केला.

स्विस पौरविधान आणि अिटालिअन दंडविधान जसे झटपट लागू केले तसेच वाणिज्यविधान ( Mercantile Law ), सैनिक-रचना, सैनिक-शिस्त, रणनीतिप्रभृति सुधारणा जर्मनीकडून अवश्य तशा घेतल्या आणि तुर्की लोकसभेनें त्यांस तशीच घाअूक संमति झटपट देअून टाकली.

हे सारे निर्बंध संमत करून व सुधारणांचे हे नुसते ठराव करूनच तुर्क लोकसभा थांबली नाहीं. केमालपाशा हा नुसता ठरावी मनुष्य नव्हता. तो वर्तावी पुरुष! ठराव करण्यांत दाखविलेल्या तांतडीहूनहि अधिक निकडीनें व नेटाने त्यानें दुसऱ्याच दिवसापासून त्या ठरावांचा वर्तावहि चालू केला अेका दिवसांत अेक युग बदलून टाकणारी युक्ति कोणत्या मंत्रानें केमालपाशास साध्य झाली? ही जादू घडवून कोणत्या कांडीनें आणली? अवघ्या अेका वाक्यानें! कोण्या अपरिवर्तनीय धर्मग्रंथांत सांगितला म्हणून कोणताहि अैहिक व्यवहार सततचा धर्म्य वा अधर्म्य ठरत नसून तो राष्ट्रास आजच्या परिस्थितींत हितप्रद आहे कीं अहितप्रद आहे या प्रत्यक्षनिष्ठ कसोटीनेंच तसा ठरविला पाहिजे. जुनें पुस्तक काय म्हणतें, हा प्रश्न दुय्यम; औषध आजोबांच्या बटव्यांतलेंच आहे ना, हा प्रश्न दुय्यम, आजच्या रोगावर तें रामबाण आहे का हा प्रश्न मुख्य! तरुण तुर्कांनीं हें सूत्र अुच्चारलें आणि मन्वंतर झालें.

पण जर का मौलवीमंडळाकडे हें काम केमालपाशानें दिलें असतें तर? त्या सुधारणांतील अेकेक शब्द धर्मग्रंथाद्वारें नक्की करण्याचे आधीं त्या धर्मग्रंथांतील किती वाक्यांचे किती अर्थ करावे लागते, किती ओढाताण, किती भाष्यें, टीका, वादविवाद! आणि शेवटीं नवमतप्रवण मौलवींनीं जुन्या शब्दांत नसता अर्थ आहेच म्हणून शास्त्रनिर्णय दिला असता आणि जीर्णमतवाद्यांनीं सुधारणा शास्त्रबाह्य आहे, म्हणूनच त्याज्य आहे, हा शास्त्रनिर्णय दिला असता!! नवमतवाद्यांना करावा लागता बौद्धिक अप्रामाणिकपणा; जीर्णमतवाद्यांना करावा लागता त्याहूनहि भयंकर असा राष्ट्रीय आत्मघात! आणि अितकेंहि करून पुनः अेकमुखी निर्णय न झाल्यानें शास्त्रार्थाचा प्रश्न राहाता पहिल्यानें जिथें होता तिथेंच! आणि तसाच अनिर्णीत!

## धर्मस्वातंत्र्याची घोषणा

यास्तव धर्मग्रंथ अुघडून सुधारणेचा प्रश्न सोडविण्याचे भानगडींत शतकानुशतकें न खर्चतां तरुण तुर्कांनीं धर्मग्रंथ मिटून तो प्रश्न सुटतो कीं काय तें पाहिलें. तों काय? धर्मग्रंथ मिटला आणि तात्काळ तो प्रश्न सुटला! व्यवहारांत

धर्मांची अशी नड अुरलीच नाहीं. धर्म ज्याच्या त्याच्या वैयक्तिक मतापुरता राहिला. त्यासरशीं तुर्कस्थानांत धर्म-स्वातंत्र्याची घोषणा करण्यांत आली. फार काय, हिंदुस्थानांत जें वाचणें अनेक अिस्लामी धर्मवीरांस केवळ नरकाचें साधन वाटतें ते हिंदूंचे वेद तुर्की विद्यापीठांतून परमादरानें, पण अैतिहासिक दृष्ट्या आज अभ्यासिले जात आहेत. कांहीं प्रमाणांत त्यांचा अभ्यास आवश्यक समजला जातो.

## अरबी लिपीचें अुच्चाटण

अरबी लिपि ही कुराणामुळें तुर्कस्थानांत धर्मलिपीचें पावित्र्य पावलेली, अितकेंच नव्हे तर तीच अेक अनन्य लिपि त्या देशांत पूर्वापार चालत आलेली, पण ती अतिशय बोजड, मुद्रणार्थी, शिक्षणार्थी पराकाष्ठेची अडाणी. तुर्कांत शेंकडा ९० अशिक्षित लोक, पण त्यांस युरोपच्या शेंकडा ९० शिक्षितांच्या मांडीस मांडी लावून बसावयाचें तर ती अरबी लिपीची धोंड वाटेंतून काढणेंच भाग! मुद्रणावर रुळलेली युरोपची रोमन लिपि समोर होतीच. केमालपाशानें तत्काळ तिलाच अुचलली. साधारणतः अेक वर्षाची अवधि ठरवून सारें सरकारी काम त्या अवधीनंतर रोमन लिपींत चालणार म्हणून आज्ञा सुटली. शाळांतून तर त्याच दिवसापासून रोमन लिपि चालू! ही लिपिशुद्धीची चळवळ अितक्या नेटानें रेटली कीं, स्वतः केमालपाशा शाळांतून ती शिकवूं लागले. केवळ दहा अक्षरें बदलतांच रोमन लिपीच्याहि तोंडांत मारूं शकेल अितकी मुद्रण आणि शिक्षणसुलभ होणारी आमची देवनागरी लिपि जर केमालपाशाचे हातांशीं असती तर त्यानें अरब लिपि बदलण्यास अेक वर्षाचा अवधिसुद्धां राष्ट्रास दिला नसता! कारण दहा अक्षरें देखील बदलण्यास पन्नास वर्षं र र र करीत रेंगाळत राहाण्यांत केमालपाशा कोणी क्षयरोगी थोडाच होता? ठरलेल्या दिवशीं त्याचें सरकारी काम, सारीं वृत्तपत्रें साऱ्या राष्ट्रभर अगदीं नवीन अशा रोमन लिपींत चालू झालीं!

## अरबी भाषेचें अुच्चाटण

तुर्कांस स्वतःची लिपिच नव्हती; पण भाषा होती. तथापि जेते तुर्क राजे असतां राजभाषेचा मान होता जितांच्या अरबीस! त्या सावटाखालीं

तुर्की भाषा पार खुजटून गेली. सारें साहित्य अरबींत, तुर्की घरादारांत अरबी शब्दांचा बाजार! स्वाभिमान जागृत झालेल्या तरुण तुर्कांस तें कसचें खपणार? शिवाजीमहाराजांनीं मराठीस ह्याच अरबीप्रभृति परकीय शब्दांच्या धुडगुसापासून मुक्त करण्यासाठीं राजाज्ञा काढली होती; पण महाराजांअितकें त्यांचें राष्ट्र करारी, चिकाटीचें नसल्यामुळें आजहि मराठींत 'कबूल', 'हल्ली', 'शिवाय', 'तहहयात' प्रभृति शेंकडों परकीय शब्द आपल्या स्वकीय शब्दांच्या थडग्यावर भरभराटलेले आढळत आहेत! केमालचें नवतुर्कांचें राष्ट्र सुदैवानें त्याच्याअितकेंच करारी पडलें. त्यांना स्वभाषेंतील थोडेसे परकीय शब्दच काढून टाकावयाचे नव्हते, तर जवळजवळ मेलेली भाषाची भाषा जिवंत करावयाची होती! पण त्यांनीं तेंहि केलें. मध्य-आशियांतील तुर्कांच्या मूळस्थानांत संशोधनमंडळें गेलीं आणि तिकडून पूर्वींचे शब्द शक्य तितके गोळा केले! पंधरा हजार शिक्षकांना तुर्की शब्द पुनरुज्जीविण्याचे किंवा नवीन निर्मिण्याचे कामावर नेमण्यांत आलें! तुर्कींत वाङ्मय नसल्यामुळें सारे साहित्यिक शब्द नवे पाडले! कोणी वीस हजार तुर्की शब्द जमवून दिले! स्वतःचे बोलण्यांत बिनतुर्की–विशेषतः अरबी–शब्द सांपडणें ही गोष्ट शिष्टाचाराविरुद्ध समजली जाअूं लागली! मंत्रि-मंडळांतील मोठमोठे 'पाशा' प्रधान अेका तासांत कोण परकी शब्द कमींत कमी वापरतो याच्या चढाओढी लावूं लागले आणि सरकारी राजपत्रांत (गॅझेटांत) प्रत्यहीं पांच नवे तुर्की शब्द राष्ट्रभर वापरण्यासाठीं प्रसिद्ध होअूं लागले.

तुर्की राष्ट्रांतहि या भाषाशुद्धीच्या वावटळीस पालापाचोळ्याचा थोडा विरोध झाला. कित्येक म्हणाले, परकीय शब्दांनीं भाषासंपत्ति वाढते. केमालपाशा म्हणाला, स्वकीय शब्द नाहींतच त्या अर्थांचे परशब्द घेअीन, त्यानें भाषा-संपत्ति वाढते; पण स्वकीय शब्द मारून जे परशब्द जिवंत राहूं पाहतात त्यानें संपत्ति वाढते असें म्हणणें म्हणजे औरस पुत्र मारून दत्तक घेतल्यानें संतति वाढते असें म्हणण्यासारखेंच आहे! स्वधर्मांतील माणसें राखून बाटलेल्यांना पुन्हां स्वधर्मांत आणणें ही खरी शुद्धि होय. पण जितके परधर्मीय शुद्ध करून घेणें तितकेच स्वधर्मीय ठार मारून टाकणें ही शुद्धि नसून बेशुद्धि आहे!! तुर्की भाषेसारखी आसन्नमरण आणि मूळचीच साधी भाषा; पण

तिचा हा केवढा अभिमान ! मग जर का कुबेरासारखा संपन्नतम शब्दसागर घेअून त्याच्या पाठीशीं, आमच्या पाठीशीं आमची संस्कृताची देववाणी आहे तशी, अेखादी भाषांची राणी अुभी असती तर त्यानें देवांच्या राष्ट्रावर सुद्धां ती स्वभाषा लादण्याची आकांक्षा धरली असती ! 'कायद्या' सारख्या शब्दासाठीं देखील आमच्यासारख्या करंट्या शालीनतेनें तो दारोदार भीक मागत थोडाच फिरता !

## अरबी पूजाप्रार्थनादि आचारांचें अुच्चाटण

नैर्बंधिक क्रांतीचे मागोमाग आचारांची क्रांति घडून आली. सारें कुराण तुर्की भाषेंत अनुवादिलें गेलें. अत्यंत पवित्र 'अल्ला' शब्द देखील अरबी म्हणून निषिद्ध झाला ! देवास तुर्कीहि कळतें ! असें म्हणून त्या अर्थाचा 'तारी' हा शब्द प्रार्थनेंत योजला. पहांटे मशिदींतून जी 'आजाना'ची आरोळी ठोकण्यांत येते तिचा मंत्र साऱ्या मुसलमानी जगांत अरबी आहे. केमालनें तो मंत्र तुर्की भाषेंत अनुवादला नि तुर्की संगीतांत बसविला. तोच तुर्कराष्ट्रभर आतां पहांटे ललकारला जातो. कुराणांतील अत्यंत प्रमुख प्रार्थना निमाजांतील पण ती अरबी भाषेंत होती. तीहि तुर्की भाषेंतच भाषांतरली जाअून निमाज तुर्कींतच पढले जाअूं लागले. कारण देवास तुर्कीहि समजत असलेंच पाहिजे ! देव कांहीं जन्मजात अरब नाहीं ! पैगंबराच्या काळापासून स्त्रियांनीं बुरखा वापरणें हाच अरबी धर्म. तुर्की तरुण स्त्रियांनीं बुरखा झुगारून दिला. अरबी बुरख्यांतून—कित्येक शतकांच्या बंदींतून—तुर्की स्त्री बाहेर आली ! स्वेच्छेनेंच नव्हे, कारण बुरखा हाच जिला धर्म वाटत होता अशी हजार हजार तुर्क स्त्रीच या सुधारणेचा विरोध करीत राहिली—पण तरुण तुर्कांनीं जो सुटेना तो बुरखा फाडून टाकला. विद्यापीठें स्त्रीपुरुषांस संमिश्र वर्गांतच शिकवूं लागलीं. बुरख्यास मज्जाव झाला. हीनतेची खूण म्हणून फेज टोपी घालणें निर्बंधविरुद्ध कृत्य ठरलें !

## फेज टोपी फेंकून दिली

फेज टोपी वापरणें हा दंडनीय अपराध ठरतांच अशिक्षित तुर्की समाजानें दंगल केली; पण ठरल्या दिवशीं ज्यानें 'फेज' फेंकली नाहीं त्याची फेज

फेंकली गेली. सभ्य स्त्रीपुरुषांनीं अेकत्र नाचणें ही अरबी आचारांत दुराचाराची सीमा ! तरुण तुर्कांनीं नगरोंनगरीं सार्वजनिक नृत्यालयें काढलीं ! स्वतः केमालपाशा अशा सभ्य नरनारींच्या सार्वजनिक नृत्यांत भाग घेअूं लागले. तुर्की स्त्रिया नगरसंस्थांतून, न्यायालयांतून, मंत्रिमंडळांत देखील, मोठमोठ्या अधिकारावर कामें करूं लागल्या. सैनिक गणवेषाचा मांडचोळणा घालून, बंदुकी खांद्यावर घेअून कॉलेजांतील कन्यावीरांचीं शेंकडों पथकें सैनिकी थाटानें मिरवूं लागलीं ! खेळांत, घोडदौडींत, वैमानिक स्पर्धेत पुरुषांसह समानतेनें भाग घेअूं लागलीं ! निर्बंधाधारें लग्नें न नोंदवितां ज्यांनीं हट्टानें मौलवींमुल्लांकडूनच धर्मविधीनें विवाह केले त्यांची संतति निर्बंधविरुद्ध ठरली ! ती नैर्बंधिक (कायदेशीर) ठरावी म्हणून मग त्यांनीं आपलीं जुनीं लग्नेंच पुन्हां जेव्हां निर्बंधानुसारें नोंदाविलीं तेव्हां प्रश्न सुटला. स्वतः महंमद पैगंबराचें अेक चरित्र केमालपाशानें आपल्या देखरेखीखालीं लिहविलें. देवदूताची (पैगंबराची) श्रद्धाशील भूमिका सोडून 'अेक अैतिहासिक पुरुष' याच भूमिकेवर तें सारें चरित्र लिहिण्यांत आलें. अेक प्रबळ अरबी राष्ट्रनिर्माता, क्रांतिकारक, धर्मप्रवण, शूर असा तो मुसलमानी धर्मसंस्थापक होता असें त्या चरित्रांत महंमदाचें शब्दचित्र रेखाटलें आणि तें अैतिहासिक चरित्रच खरें चरित्र म्हणून साऱ्या विद्यालयांतून शिकविण्यांत येण्याची व्यवस्था केली.

## विरोधाचा शतमुखी रावण

ही क्रांति केमालपाशाला सुद्धां विरोधावांचून करतां येणें शक्यच नव्हतें. 'हळूहळू', 'सुवर्णमध्य', 'अतिरेक', 'वचनात्प्रवृत्तिर्वचनात् निवृत्तिः' प्रभृति नांवांच्या अनेक प्रबळ पुढाऱ्यांचे नेतृत्वाखालीं केमालपाशाच्या तरुण तुर्कांवर जुन्या तुर्कांनीं चौफेर हल्ल्यांवर हल्ले चढविले ! तुर्कस्थान स्वतंत्र करणारा केमालपाशा स्वदेशांत मोठा लोकप्रिय असला पाहिजे असें बाहेर सहजच वाटतें; पण सुधारक म्हटला कीं तो स्वातंत्र्यवीर असला तरी, बहुधा बहुजनांत अप्रियच असणार. कारण सुधारणा म्हणजेच अल्पमत व बहुमत तीच रूढि. रशियांत तीनचतुर्थांश लोक लेनिनवर तुटून पडले. मसोलिनीवर अजूनहि वर्षाकांठीं दोनचार अिटालियन मारेकरी घाला

घालतातच. डी. व्हॅलेराविरुद्ध आयर्लंडांत केवढा मोठा पक्ष जळफळत आहे! त्यांतहि धार्मिक वा सामाजिक सुधारणेंत लोकप्रियतेचें नांवहि घेण्यास नको. 'वरं जनहितं ध्येयं केवला न जनस्तुतिः' हा बाणा ज्यास धरवेल, ती धमक अंगीं असेल, त्यानेंच तें पाअूल टाकावें; तशाच निडरपणें केमालपाशानें तें पाअूल टाकलें. अकस्मात् सुधारकांचा धडाका अुडाला आणि लोकसभेच्या दाराशीं राजकीय केंद्राकेंद्रावर तोफांच्या रांगा रोखून, जुन्या पक्षाशीं युक्तिवाद करण्याचें काम प्रथम त्या तोफांच्या तोंडाकडेच सोंपवून, केमालनें जो अपरिवर्तनीय म्हणून पूज्य झाला तो धर्मग्रंथच्या ग्रंथ अपरिवर्तनीय म्हणूनच रद्द करून टाकण्याचें मुख्य काम तडकाफडकीं पार पाडलें. नंतर मतपरिवर्तनार्थ त्यानें सारें मुद्रण, सारें वाक्पीठ, सामोपचाराच्या साऱ्या कला कामास लावल्या; पण असंतोषाची आग विझेना. फेज टोपी रद्द केली म्हणून अशिक्षितांनीं दंगे केले कुराणांतील पवित्र अरबी मंत्र रद्द करून तुर्की भाषेंत चालू केले. म्हणून अरब मुल्लामौलवींच्या अनुयायांनीं आग पाखडली. केमालवर मारेकऱ्यांचे घाले पडले. शेवटीं कुठें कुठें पलटणी देखील फितल्या आणि सशस्त्र बंडें अुठलीं! तुर्कांच्या बाहेरच्या शत्रूंनींहि या यादवींत थोडेंफार तेल ओतलें; पण ते तरुण तुर्क अल्पसंख्य असतांहि अल्पबळ नव्हते. त्यांच्या शिस्तीनें, शौर्यानें युरोपच्या तोंडांत मारली होती. त्यांनींहि रुद्ररूप धारण करतांच दंगेखोरांची धूळधाण अुडाली. बंडाचें कंबरडें मोडलें. स्थलाभावामुळें ती झुंज अुल्लेखनीय असतांहि वर्णितां येत नाहीं. तरीपण अेक अुदाहरण देअूं.

## मुस्लीम सनातन्यांचें बंड!

आज ब्रूसाला सरकारी आज्ञेप्रमाणें मुअज्जीन (पुरोहित) निमाज पढण्यास नेहमींप्रमाणें आला; पण अरेबींत निमाज न पढतां आज प्रथमच तो पाखंडपणें तुर्कींत पढला जाणार होता! हजारों वर्षांच्या रूढीचा आज भर चव्हाट्यावर शिरच्छेद होणार होता. जनसमुदाय जमला होता. निमाजाला मुअज्जीननें आरंभहि केला; पण 'अल्ला' शब्द गाळून 'तारी' हा नवा तुर्की शब्द अुच्चारलेला अैकतांच मग मात्र क्षोभ कोणास आवरेना! अुठा, धर्मनिष्ठ हो, अुठा! असा अेकच कल्लोळ अुठला. हजारों लोक बिघडून अुठले,

निमाजभंग झाला! नगरभर नव्याजुन्यांत हाणाहाण चालू झाली. पोलीस थकले. अुपद्रव दिवसानुदिवस वाढत चालला. दंग्याला वाढत्या बंडाचें रूप आलें. शेवटीं स्वतः केमालपाशांना ब्रूसाला यावें लागलें. तोंडदेखल्या गोष्टींनीं आतां भागत नाहीं हें दिसतांच त्यांनीं बेयोनेटांशींच गांठ घातली. पन्नास-साठ मुल्लामौलवी पाडाव केले, हातीं आले ते फांशीं गेले. प्रकरण थंडावलें. सरकारी निर्बंधाचा (कायद्याचा) वचक दूरवर पक्का बसला. याचप्रमाणें अेका मोठ्या कटांत मोठमोठे सरदार धरले जाअून चौकशींअंतीं त्यांना केमालनें फांसांवर टांगून दिलें. त्यांत त्याचा बालमित्र अरीफशाहि होता. ते तिकडे ज्या वेळीं फांसावर लटकत होते त्या वेळीं केमालपाशा अिकडे जनिक नृत्यालयांतील स्त्रीपुरुषांच्या अेका मोठ्या संमिश्र नाचांत स्वतः नाचत होते! विरोधाचा शतमुखी रावण जेव्हां जेव्हां सशस्त्र शासनवाद करूं आला तेव्हां केमाललाहि कृपाणाच्या अशा कठोर कोटिक्रमानेंच त्याची समज पाडतां आली!

## कालचा पाखंड! आजचा पुण्यश्लोक

पण हें पहिल्या धडाक्याच्या तीनचार वर्षांत जें काय झालें तें झालें. आज तुर्कस्थानच्या प्रजासत्ताक राज्यस्थापनेला दहा वर्षें झालीं. नवथरच तुर्कस्थानभर तो दशम वार्षिक वाढदिवस अुभ्या राष्ट्रानें गाजविला! अपरि-वर्तनीय अरब संस्कृतीशीं जखडून टाकल्यामुळें तुर्कस्थान युरोपपुढें हतवीर्य व हतप्रभ होअून गेला होता, पण ती Theocracy, तें धर्मसत्ताक राज्य, ती खिलाफत अुखडून टाकून वैज्ञानिक संस्कृतीचें आणि प्रजासत्ताक राज्याचें जीवदान दिल्याविषयीं तें सारें राष्ट्र केमालपाशांचे चरणीं त्या दिवशीं आपली कृतज्ञ-पुष्पांजलि अर्पितें झालें! कालचा पाखंड केमालपाशा आजचा पुण्यश्लोक झाला!

---

— ४ —

# शिवरायांच्या यशस्वी राजनीतीचें

‘ श्रद्धानंद, ’
मुंबअी

# अेक सूत्र

**॥ कातर्यं केवला नीतिः शौर्यं श्वापदचेष्टितम् ॥**
**॥ अतःसिद्धि समेताभ्यामुभाभ्यामन्वियेष सः ॥ १ ॥**

महाराज अगदीं लहान होते. आठ अेक वर्षांचे सुद्धां नसतील. तेव्हांपासून आपल्या धर्मांची नि जातीची अवनति पाहून त्यांचें हृदय तळमळत असावें. तेव्हांपासून या अवनतीच्या प्रतिकारार्थं मी काय करूं शकेन याचे विचार त्यांचे चित्तांत घोळत असत. तेव्हांपासून माझ्या राष्ट्राच्या नि माझ्या धर्माच्या गौरवासाठीं, स्वातंत्र्यासाठीं, सामर्थ्यासाठीं मी आपला प्राणहि देअीन ही प्रतिज्ञा करीत असावे. त्यांच्या त्या चिमुकल्या मस्तकांत ‘ हिंदवी स्वराज्या ’च्या प्रचंड कल्पना नि मनोहर स्वप्नें अुदय पावत, विस्तार पावत, प्रसार पावत; अेखाद्या विद्युत्प्रवाहासारखी त्यांच्या संगतींत रहाणाऱ्या बालकांच्या, तरुणांच्या अितकेंच नव्हे तर वृद्धांच्याहि अंगात संचार करूं लागत.

स्वदेशाच्या नि स्वधर्माच्या स्वातंत्र्यासाठीं प्राणहि अर्पण करण्याचा निश्चय केला खरा. पण प्राण स्वातंत्र्यार्थ द्यावयाचे म्हणजे कसे द्यावयाचे ? समोर प्रथम दिसेल त्या मुसलमानी तटाच्या भिंतीवर डोकें फोडून ? वा जें प्रथम वाटेंत भेटेल त्या मुसलमानी राजद्वाराशीं धरणें धरून—अुपास करून—दे माझें स्वातंत्र्य परत-आण तो माझ्या राष्ट्राचा राजमुकुट अिकडे, नाहीं तर हे आम्ही सर्व मावळे, मराठे, ब्राह्मण तुझ्या घरांत अुपास करून मरतों ! असें म्हणून विजापूरच्या नि औरंगजेबाच्या दारांत वा वेशींत प्रायोपवेशन करून ?

हे अुपाय अनेक लोकांनीं करून पाहिले होते. अनेक वेळां मोंगल बादशहांनीं त्यांस भीक घातली नव्हती. अेकदां प्रत्यक्ष दिल्लींतसुद्धां ही गंमत होअून चुकली होती. हिंदूंना शक्य त्या अुपायांनीं बाटविण्याचा नि त्यांचेवर करांचें

जड ओझें अधिकाधिक लादण्याचा अवरंगजेबाचा प्रयत्न जेव्हां सर्व हिंदूं त्राहि त्राहि करविता झाला, तेव्हां अेकदां शेंकडों हिंदी पुढाऱ्यांनीं दिल्लीस जमून आपली कागाळी प्रत्यक्ष अवरंगजेबाचे कानांवर घालावी नि त्य पीडेचा अंत होअीपर्यंत तेथून हालूंहि नये असा निश्चय करून दिल्लीस प्रयाण केलें. आपण प्रजा, तो राजा. आपण जर त्याचे दाराशीं न्याय मागावयास गेलों नि न्याय दे नाहीं तर आम्ही या आमच्यांतील अनेक ब्राह्मणांसह तुझ्य दाराशीं धरणें धरून बसतों. मग तूं आम्हांस लाथा मार, बुक्या मार, काय वाटेल तें कर असें म्हटलें नि वर्तलें असतां बादशहास दया आलीच पाहिजे, आत्म बलानें तो जिंकला गेलाच पाहिजे असें भाबडतपणें समजून ते सहस्रों लोक दिल्लीच्या राजवाड्याभोंवतीं गोळा होअूं लागले. तो शुक्रवारचा दिवस असल्यानें बादशहा अवरंगजेब मशिदींत जावयाचा होता. बादशहाची स्वारी सिद्ध झाली. हजारों घोडा थयथयाटत स्वारीपुढें रांगांनीं अुभा राहिला सहस्रों घोडेस्वार झकझकणाऱ्या तरवारी, भाले, बंदुका पेलीत त्या अश्वांवर अैटीनें स्वार झाले. मध्यें प्रचंड हत्तीवरच्या अुंच अंबारींत अवरंगजेब बसून अेखाद्या दुष्प्राप्य दानवासारखा दिसूं लागला. ती स्वारी थोडी पुढें सरकते तों ते धरणें धरावयास आलेले सहस्रों हिंदु "न्याय द्या! महाराज, न्याय द्या!" म्हणून ओरडत स्वारीच्या मार्गावर आडवे झाले. त्यांस भालदार शिपाअी दूर करूं लागले. ते हटेनात. हिंदूंवर होत असलेले अत्याचार नि लादले जाणारे अन्याय्य कर दूर झाल्याविना आम्ही हालणार नाहीं अशी अेकच ओरड झाली. अवरंगजेब क्षणभर अुभा राहिला. लोकांस वाटलें शेवटीं निःशस्त्र प्रतिकारानें डाव जिंकला. दगडासहि पाझर फुटला. दयेनें अग्नीहि थंड झाला. अितक्यांत अेक मुल्ला म्हणाला, निमाजाचा वेळ अगदीं सन्निध आला आहे! अधिक थांबल्यास प्रार्थना अधर्म्य होअील. अवरंगजेब म्हणाला, "चालवा हत्ती पुढें!" ते सहस्रों हिंदु म्हणाले, "मायबाप! आमचें म्हणणें अैकावें मग पुढें जावें." अवरंगजेब म्हणाला, "त्यांस मार्ग सोडून अुभे करा" रक्षक म्हणाले, "ते मार्ग सोडून जात नाहींत, ते मार्गावर आडवे पडले आहेत!"

"बरें तर, त्यांच्यावरूनच हत्ती चालवा!!" अवरंगजेब म्हणाला.

तरीही ते त्रस्त हिंदु, आपण मार्गावर आडवे पडलों आहोंत, आतां सागर तरून राम जाअूं शकेल; पण ह्या सर्व दिल्लीच्या मार्गावर अुपाशीं-तापाशीं

पालथ्या पडलेल्या आमच्या आत्मबळास अुल्लंघून हा अवरंगजेब कसा जाअू शकणार? अशा विश्वस्त धैर्यानें तसेच मार्गावर पडून राहिले. तोंच त्या स्वारींतील अवरंगजेबाच्या आज्ञेनें चवताळलेले अश्व, हत्ती, अुंट नि पदाती अल्ला हो अकबरची गर्जना करीत तिळभरहि न डगमगतां त्या माणसांच्या फरशीवरून थयथयाटत घुसले! त्यांस चेंदीतमेंदीत पार निघून गेले! मअू पायघडीवर पाय टेकण्यास जितका अल्प अडथळा होतो तितक्याहि अडथळ्याविना बादशहाची स्वारी मशिदींत जाअून पोंचली. तो राजमार्ग चेंदामेंदा झालेल्या हिंदु रक्तमांसांनीं चिणून गेला.

तेव्हां पूर्वीच्या असल्या अनुभवास पाहून नि अैकून आलेला अेक गोसावी महाराष्ट्रांतील सह्याद्रीच्या अेका शिखरावर अुभा राहून गर्जला:—' देशार्थ, धर्मार्थ, राष्ट्रार्थ प्राण द्यावयाचा निश्चित जो मार्ग तो असा नाहीं. पुण्यात्मा आणि पापात्मा ॥ दोहींकडे अंतरात्मा॥ परंतु साधू भोंदू सीमा॥ सांडूंच नये॥ हे धकाधकीचीं कामें॥ तीक्ष्ण बुद्धीचीं वर्मे॥ मोठ्या भावार्थें संभ्रमें॥ कैसें घडे॥ धटासी आणावा धट॥ अुद्धटासि पाहिजे अुद्धट॥ खटनटासी खटनट॥ अवश्य करीं॥ धर्मासाठीं मरावें॥ मरोनि अवध्यांसी मारावें॥ मारितां मारितां घ्यावें॥ राज्य आपुलें॥ हे धूर्तपणाचीं कामें॥ राजकारण करावें नेमें॥ ढिलेपणाच्या संभ्रमें॥ जाअूंचि नये॥'

महाराजांच्या चित्तांत हा अुपदेश पूर्णपणें ठसला. केवळ शौर्यानें नव्हे नि केवळ कातर्यानें नव्हे, केवळ दंडेलीनें नव्हे नि केवळ नरमाअीनें नव्हे, तर जिथें जसा प्रसंग पडेल तसा तिथें तसें वागून आपलें मुख्य ध्येय—आपलें मुख्य अवतारकार्य—साधावयाचें, हा त्यांनीं निश्चय केला. त्यांनीं निश्चय केला कीं—

**॥ साप विखारी देशजननिचा ये घेअूं चावा ॥**
**॥ अवचित गांठुनि ठकवुनि भुलवुनि कसाहि ठेंचावा ॥**

महाराज लहानपणीं शिकलेलें त्यांच्या राजनीतीचें हें मुख्य सूत्र प्रौढवयींहि कधीं विसरले नाहींत. ते विजापुरास आपल्या पित्यासह गेले होते. तेव्हां त्या यवनी बादशहास पाहून दिपून जाण्याचे स्थलीं त्यांचा सात्त्विक कोप भडकून अुठला. त्यांचे पाय अेखाद्या लोहस्तंभाप्रमाणें ताठ झाले. ते कुर्निसात करण्या-

साठीं कांहीं केल्या लवेनात. त्याचप्रमाणें विजापूरच्या दरबारांत गाओचची होत असलेली हत्या पाहून त्यांनीं स्वतः ओका मुसलमानास छाटून काढलें. त्यांनीं अफझुलखानाची मगरमिठी पडतांच त्या प्रचंड दैत्यास अचाट साहस करून पोटांत वाघनखें खुपसून खालीं लोळाविलें! भर मध्याह्नरात्रीं शाहिस्तेखानाच्या प्रत्यक्ष राजवाड्यांत शिरून त्याच्या सहस्रों सैनिकांचे भर गोटांत त्यावर वार चढाविला नि हां हां म्हणतां पुन्हा जसेच्या तसे निसटून सिंहगड पाठीशीं घातला. असलीं अचाट कर्मे करणारा शिवाजी भ्याड होता असें समजण्यास वा सांगण्यास कोणाची छाती आहे? प्रत्यक्ष रामदासांना या त्याच्या अचाट साहसाची, कहातीपणाची, जीवाविषयींच्या निष्काळजीपणाची भीति पडून "मोहरा पेटला अभिमाना॥ मग तो जीवाकडे पाहेना॥" हें कांहीं ठीक नाहीं असें शिवाजीस सांगावें लागलें. धुरेनें युधास जाणें। औसीं नव्हेत कीं राजकारणें। धुराच करून सोडणें। कित्येक लोक॥ अशी चेतावणी द्यावी लागली.

परंतु प्रतापाचा नि साहसाचा असा हा केवळ सूर्य असतांहि जेव्हां तें साहस वा तो प्रताप आपल्या अंगीकृत राष्ट्रस्वातंत्र्याचे विरुद्ध जाऊं पाही नि जेव्हां स्वीकृत महत्कार्याचे यशास्तव शौर्याचे स्थलीं शहाणपणा, शक्तीचे स्थलीं युक्ति नि तेजाचे स्थलीं थिल्लरपणा आधिक उपयुक्त दिसला तेथें तेंच शिवाजीराजे असे वांकून घेत कीं, तेवढेच स्थलीं ज्यांनीं त्यांस पाहिलें वा त्यांचें तेवढेंच कृत्य ज्यांनीं ऐकलें अशा कित्येक क्षुद्र मनुष्यांनींहि म्हणूं लागावें कीं, शिवाजीहून मी किती तरी शूर मनुष्य आहें. हा केवढा भित्रा!

जावळीच्या विस्तीर्ण मंडपांत जेव्हां विजापूरचा पराक्रमी, तेजस्वी नि दैत्यासारखा धिप्पाड सेनापति अफझुलखान मिशांवर ताव देत बसला होता, जेव्हां त्याचें तें प्रचंड सैन्य शेजारींच मैल-मैल पसरलें होतें, जेव्हां त्याच्या केसास धक्का लागतांच शेंकडों तोफा धुव्वा ओडवून देण्यास गुरगुरत होत्या, तेव्हां या मंडपांत रुमालानें हात बांधलेला, 'मला शस्त्राचें भय वाटतें, कृपा करून आपण मला सडेंच भेटावें' म्हणून थरथरत कांपत म्हणणारा, ठेंगणा, दचकत पाय टेंकणारा, विजापूरच्या अपराधांची सेवकास क्षमा असावी अशी याचना करणारा नि मी माझें शीर कृतकर्मांची क्षमा मागून आपले पायीं

ठेवतों म्हणून अफझुलखानापुढें गयावया करणारा अेक अगदीं थिल्लरसा मनुष्य त्या मंडपांत शिरला, तो शिवाजी होता. त्याच्या त्या वेळच्या मुद्रेवरून, शब्दांवरून नि वर्तनावरून पहाणारांस असेंच वाटलें कीं, त्याहून भित्रा मनुष्य या जगांत कोण आहे?

तो अफझुलखानासमोर आला. अफझुल्लानें त्यास सहज बगलेंत दाबलें — जसें आपण सहज अेखाद्या हरिणाची मान बगलेंत दाबतों. तों काय झालें? तरवार चमकली. पोटांत वाघनखें घुसलीं. तो धिप्पाड खान चीं चीं करीत, अंकुशघातानें चीं चीं करणाऱ्या अेखाद्या हत्तीसारखा कोलमडूं लागला. पट्ट्यास पट्टा, खंजिरास खंजीर, तोफेस तोफ भिडली! खान ठार झाला! खानाचीं फौज ठार झाली, उधळली गेली.

## शीर छाटून, पोट फोडून

गोट लुटून शिवाजी अेखाद्या सिंहासारखा गड चढूं लागला! देवीचा सूड घेतला, देवाचा सूड घेतला. शत्रूचा बारा सहस्र घोडा पाडाव करून बांधून टाकला. अेका क्षणापूर्वी या जगांतील अत्यंत भित्र्या मनुष्यासारख्या दिसणाऱ्या त्या शिवाजीहून आतां या जगांत अधिक शूर, दीप्तिमान् नि साहसी कोण? त्या वेळीं तो थिल्लर दिसला म्हणूनच या वेळेस त्याच्या मुद्रेवरील त्या दिग्जयी दीप्तीवर कोणाची दृष्टि ठरत नाहीं. त्या मंडपांत शिरते वेळीं तो मान अवनत करून शिरला म्हणूनच आतां तो त्या मंडपांतून विजयाचे पाठीवरील अुन्नत अंबारींत बसून मान ताठ करून बाहेर येत आहे!

पुढें जयसिंग आला. पुन्हा ध्येयासाठीं नम्रता स्वीकारून त्याच्याशीं संधि करणें भाग पडलें. घेतलेले गड दिले, बादशहाविरुद्ध केलेल्या बंडाची क्षमा मागितली, पत्करूं नये ती त्याची नोकरीहि पत्करली नि बादशहास पत्र लिहिलें:—

"मी शिवाजी आपला गुन्हेगार नि अपराधी आहें. आपणांस शरण येअून जीव नि धनदौलत रक्षण करण्याची अिच्छा धारण करीत आहें. अितःपर मी आपली नौकरी अिमानानें बजाविण्यास सदैव तत्पर राहीन आणि आपली आज्ञा पाळण्यांत भूषण मानीन. बंडाळी करून मी आपल्या सर्वस्वाचा घात

कधींहि करून घेणार नाहीं. मला सर्व अपराधांची क्षमा करून जीवदान द्यावे अेवढेंच या दासाचें आपणांपाशीं मागणें आहे. ”

हें पत्र नि खालीं दिलेलें मूळपत्र जदुनाथ सरकारनें प्रसिद्ध केलें नि त्याचा आपल्या बखरींतून अुल्लेखहि आहे. हें पत्र जातांच धूर्त अवरंगजेबानें पानावर पान ठेवून शिवाजीस क्षमादानाचें पत्र, पोशाख नि आज्ञा धाडली. तें कळतांच “ मुसलमानी धर्मरक्षक ” शिवाजी त्या आज्ञेचे सत्कारार्थ सहा मैल पायीं चालून सामोरा गेला ! नि पुन्हा प्रत्युत्तर लिहिता झाला :

“ बादशाही ठसा नि पंजा यांनीं अलंकृत झालेली आपली कृपापूर्ण आज्ञा येअून पावली. ह्या योगें बादशाहांनीं मला जीवदान दिलें आहे. या पापी दासाचे अपराध क्षमेस पात्र नसतांहि बादशहांनीं केवळ अुदार अंतःकरणानें कृपा केली हें त्यांस मोठें भूषण आहे. मी आज्ञेप्रमाणें विजापूरकरांवरहि चालून जाअून नि त्या युद्धांत विशेष पराक्रम गाजवून पूर्वीचा काळिमा धुअून काढीन. आपल्या अनंत अुपकारांची फेड अंशतः तरी करीन. ”

या ‘ मुसलमानी धर्मरक्षक ’ शिवाजीनें पुढें मुसलमानी धर्माचें ‘ गोब्राह्मण प्रतिपालक ’ छत्र अुभारून किती संरक्षण केलें नि ‘ तुमची नोकरी अिमानानें पाळीन ’ म्हणून वचन देणाऱ्या या अैंद्रजालिकानें त्या औरंगजेबाची चाकरी पुढें कशी बजाविली हें अितिहास-प्रसिद्धच आहे !

पण शिवरायांच्या कृत्यांचा पुढचा अितिहास ज्यांच्या आंधळ्या डोळ्यांना दिसूं शकला नाहीं किंवा त्या वीरसिंहाच्या मागच्या अनंत धाडसाची, अपूर्व साहसाची नि दीप्ततम तेजाची दीप्ति नि स्मृति ज्यांच्या थिल्लर नि कृतघ्न मनांत राहूं शकली नव्हती अशा तत्कालीन बायाबापड्यांनीं अेकच कोल्हे-कुअी करण्यास आरंभ केला. अफझुलखानाकडे नुसत्या पहाण्यानेंहि ज्यांची गाळण अुडाली असती, आजन्म मुसलमानांपुढें कुरनिसात करतां करतां ज्यांच्या गुढग्यांस घट्टे पडले होते नि विजापूरच्या नि दिल्लीच्या मार्गांतून गाअींच्या कसाअीखान्यांसमोरून चालतांना मुसलमान रागावतील या भयानें नाकास पदर लावून चालण्याचेंहि साहस ज्यांनीं केलें नाहीं असले भ्याड, देश-शत्रूच्या नौकराणींचे नौकर तेहि नाक मुरडून म्हणाले कीं, “ छी, भ्याला लेकाचा ! असलीं पत्रें धाडण्यापेक्षां शिवाजी मेला असता तर पत्करलें असतें. ! ”

मूर्खांनो ! विजापूरच्या भर मार्गांत गोवधानें चिडून मुसलमान कसायाचा लहानपणींच शिरच्छेद करणारा, अफझुलखानाचा हंता, शाहिस्त्याचा शास्ता, रामदासांचा पट्टशिष्य, अखिल हिंदुराष्ट्राची मूर्तिमंत महत्त्वाकांक्षा असलेला हा ' भित्रा ' शिवाजी तुमच्यासारखा गुलामगिरीच्या नरकांत पिचणाऱ्या लाखों " वीर्यशाली " कीटकांपेक्षां जर अधिक भित्रा होता आणि तुम्ही जर आपणांला अेवढे वीर्यशाली समजतां तर तुम्ही कां या धर्मयुद्धांत नि स्वातंत्र्ययुद्धांत त्याच्याहून अधिक शूरतेनें लढत नाहीं ? शाअिस्त्याला पिटाळून नि पांच शाह्यांस रगडून मग अेक पत्र शिवाजीनें लिहिणें नि तेंहि अेवढ्यासाठीं कीं, त्या योगें रगडलेल्या पांच शाहींस नि अुरलेल्या या मुख्य बादशाहीसहि पिसून पिसून मातीला मिळवितां यावें म्हणून ! तुम्ही जेव्हां शाहिस्त्याला माराल नि पांच पादशाह्या रगडाल आणि तरीहि भित्रें पत्र लिहिणार नाहीं तेव्हां कुठें तुमच्या या बालिश बडबडीचें समर्थन क्षणभर कोणी श्रवण तरी करील. तोंपर्यंत हा अेक शिवाजी मेला असता तर बरें असें म्हणण्याचे स्थलीं स्वदेशासाठीं रक्ताचा अेक थेंबहि ज्यांनीं सांडिला नाहीं, शत्रूचे जे जन्माचे मिंधे, जे शत्रूवर धर्मयुद्धांत हात अुगारणें तर दूरच; पण दुसरे कोणी अुगारूं लागतांच गर्जूं लागणाऱ्या शत्रूच्या क्रोधाच्या डुरकाण्या अैकतांनाहि सकंप, दार लावून आंत चुलीपाशीं जाअून बांगड्या भरून लपून बसतात नि जे तिथें मात्र शिवाजीच्या भित्रेपणाला हसतात अशा तुमच्यासारख्या लाख बायाबापड्या मेल्या तरी चिंता नाहीं असेंच अितिहास गर्जत रहाणार !

अितक्यांत ' मुसलमानी धर्मरक्षक ' शिवाजीस बादशहानें पत्र लिहिलें—

" भेटीस या म्हणजे बादशाही कृपा संपादन कराल ! " महाराजांनीं युक्तीनें मूग गिळून भेटीस जाण्याचें ठरविलें तों अवरंगजेबानें दरबारांत पांच हजारी स्वारांत शिवाजीला अुभें केलें. पांच हजारी स्वारांत शिवाजीला !—कीं, ज्यानें अखिल भारताचे सिंहासनावर आपला अधिकार सांगितला—त्याला अुभें केलें. अंतर्गत तेज उसळून बाहेर येअूं लागलें. मुद्रा लाल झाली, रागानें पुटपुटत महाराज कांहीं वांकडेतिकडे शब्दहि पुटपुटत गेले; पण त्वरित त्या क्रोधाच्या तलवारीस तितिक्षेच्या कोषांत तसेंच बळेंच दाबून शिवाजी राजे नेमून दिलेल्या घरीं गेले. तों तें घर तुरुंग झाला नि अवरंगजेबाचे सशस्त्र

पहारे उभे राहिले. त्या वेळेस आपल्या अंगीकृत कार्याकडे जावयास, हिंदु-स्वातंत्र्यश्रीच्या भावी राजमंदिरांत घुसावयांस अेक लहानशी दिंडी काय ती अुघडी होती; पण तींतून मान अगदीं खालीं घालून, गर्वाचा ताठा अगदीं नाहींसा करून, अपमानाच्या आकुंचनांत अंगें अगदीं दडपून टाकून गेलें तरच क्वचित् त्या दिंडींतून निसटून पुढें जाण्याचा संभव होता. जर तिथें शिवाजी म्हणता, मी मान लववायचा नाहीं ! मी हिंदु स्वातंत्र्याचा ध्वज ! मी जीव गेला तरी लवणार नाहीं, तर तें कृत्य जरी निंदनीय झालें नसतें तरी अभिनंदनीयहि झालें नसतें. तेव्हां ताठपणा नव्हे तर आकुंचनच अभिनंदनीय ! पण निष्फळ नव्हे तर अभिनंदनीय असूनहि सफळ होणारें होतें. म्हणून महाराजांनीं त्या दिंडींतूनच हिंदु राज्यश्रीच्या मंदिराकडे जाण्याचा निश्चय केला. जो पहारेकरी येअील त्याची स्तुति केली. कोणास पेटाऱ्यांतून मेवा धाडला. मी " मुसलमानी धर्मरक्षक शिवाजी. मी कधींहि बादशहाशीं वैर करणार नाहीं. मी गरीब आहें. मी अपराधी आहें ! " अित्यादि निरोप त्यांनीं मुसलमानी सरदारांस धाडले नि अेक दिवस त्या पेटाऱ्यांतील पेढे, मिठाअी नि अफू खाअून गुंग झालेल्या सर्व सरदारांचे हातांवर तुरी देअून महाराज त्यांचे हातून निसटून गेले ! ज्या वेळेस ते अेका पेटाऱ्यांत अंगें आवळून, वर भूस, खालीं भूस, वर मिठाअी खालीं मेवे असे अेखाद्या पिंजऱ्यांत पडलेल्या अुंदरासारखे बसले होते त्या वेळेस ते तसेंच पहारेकऱ्यांस सांपडते तर अवरंगजेब मोठ्यानें हसून निश्चित् म्हणाला असता, " बेशक यह बेशरम अेक पहाडका चुवा है ! कैसा चुवेके माफक छिपता है, देखो ! " पण त्या वेळीं अुंदरासारखें होणें हेंच खरें शौर्य होतें. त्या वेळेस सिंहासारखी गर्जना करणें ही शौर्याची केवळ विटंबना मात्र झाली असती !

थोडाच वेळ निघून गेला. महाराज सुरक्षित रायगडला आले आणि मग सिंहगर्जनेची खरी वेळ आली ! दरी डोंगरांतून तोफेनें अशी गर्जना केली. तो महाराष्ट्राचा सिंहनाद अैकून पूर्वी ज्यास तुच्छतेनें अवरंगजेब ' अुंदीर ' म्हणत होता त्यासच ' सैतान ' असें त्रासानें म्हणूं लागला.

थोडेच दिवसांत रायगडावर हिंदुपदपादशाहीची मुहूर्तमेढ रोवून, हिंदुश्रीचा स्वातंत्र्यध्वज अुभारून, हिंदु सिंहासनावर गोब्राह्मणांचे पालनकर्ते श्रीशिव-छत्रपतिमहाराज अवरंगजेबाचे छातीवर हिंदुसाम्राज्याची प्राणप्रतिष्ठा करते झाले !

जयसिंगाला तें शरणागतत्वाचें पत्र लिहितांना, मल्लयुद्ध पूर्ण भरांत असतांना शत्रूला पेंच मारून अुलथून पाडण्यासाठींच पण त्याचे पुढें नम्र होअून त्याचे पायाला हात घालतांना बायाबापड्या मूर्खपणाच्या डौलाने नि तिरस्कारानें शिवाजीवर ओरडल्या होत्या, " थू: शरण गेला! शत्रूचे पाय धरले!" आतां त्या पाय धरणाऱ्या हातानें तोच शत्रूचा पाय हिसडून टांग मारून त्याच पेंचानें शत्रूस चीत करतांच हरिद्वारापासून कन्याकुमारीपर्यंत हिंदु जनता टाळी देअून गर्जली — गर्जत आहे — आणि गर्जत राहील कीं, " भले वीर! खूप पेंच मारला! शत्रूस चारी मुंड्या चीत केला!"

ही झाली शत्रूची गोष्ट. दुष्टाशीं महाराज असे वागले. कपटनीतिपटूशी हें वर्तन झालें. पण सुष्टाशीं? साधूशीं? रामदास म्हणतात, " आचारशील, विचारशील। न्यायशील धर्मशील। सर्वज्ञ सुशील। जाणता राजा॥" कीं ज्यानें अितक्या खटाटोपानें संपादिलेलें राज्य अेका कागदाच्या केवळ चिटोऱ्या-वर केवळ अेका शब्दानें हें राज्य 'रामाचें' म्हणून निर्देश करून दासांचे झोळींत भिक्षा घातली आणि आपण 'हिंदुधर्मासाठीं फकिरी घेतली!'

## आदानं हि विसर्गाय सतां वारिमुचामिव।

साध्य जर पवित्र आहे तर त्याचेसाठीं गाजविलेलें शौर्य नि दाखविलेली नम्रता, केलेलें रण वा निघालेलें शरण हीं दोन्हीहि पवित्रच आहेत. जें जें साधन पवित्रतम साध्याचे सिद्धीस्तव अपरिहार्य नि अंतीं मनुष्यजातीस लाभकारक ठरतें त्याचें त्याचें अवलंबन पवित्रच होय.

हिंदुधर्माचें पुनरुज्जीवन करून स्वराज्याचा प्राणाधार जें स्वराज्य तें संपादन करणें ही अिच्छा जर न्याय्य आहे, हें कृत्य जर धर्म्य आहे, हें ध्येय जर दैवी–अीश्वरी संपत्तीचे आगर आहे, तर मग त्या ध्येयाचे सिद्धीसाठीं जेव्हां शौर्यानें काम होण्यासारखें असेल तेव्हां सिंहाच्या तोंडांत हात घालून त्याचे दांत अुपटण्यास धांवणारें दुर्दांत शौर्य मी प्रकट करीन; पण जेव्हां तें महाकार्य शौर्यानें साधण्याचे स्थलीं अुलट बिघडणारें आहे, तेथें मी भयंकर भुजंगास भुलवून आणणारी आपली नम्रपणाची मंजुळ पुंगी वाजवीन. ह्या ध्येयाचे पूर्णतेसाठीं, देवाच्या कार्यासाठीं, जनतेचे कल्याणासाठीं मी केव्हां 'बळीस'

अगदीं दुर्बळ दिसणारी वामनमूर्ति धारण करीन, जरासंधाच्या नगराच्य महाद्वारांतून विजयवाद्यें वाजवीत शिरण्याचा मूर्खपणा करण्याचे स्थर्ल छद्मवेशांत आडमार्गानें दीनासारखा प्रवेशीन, कालवनापुढें भरधांव पळ काढीन, मुचकुंदाच्या गुहेंत लपेन, भीमासारखा सैंपाकी होओीन, पण संधि साधतांच अेकाअेकीं अुलटून रामासारखा रावणावर तुटून पडेन, नृसिंहासारख घोर होओीन, अभिमन्यूसारखा विजय पाहण्याचीहि आशा न धरतां मारल जाओीन — पण—

**व्यूहीं शिरेन सरसा मागें परतेन अेक पदही न।**

शिवरायांच्या राजनीतीचे हें सूत्र होतें, म्हणूनच अवरंगजेबासारख्या कपटी बापास बाप न म्हणणाऱ्या, मुसलमानी बादशहाचे तोडीस तोड देअून त्यांना हिंदुपदपादशाही स्थापन करतां आली.

शिवरायांच्या यशस्वी राजनीतीचें हें मर्म होतें. अेतदर्थंच

**॥ कातर्यं केवला नीतिः शौर्यं श्वापदचेष्टितम् ॥**
**॥ अतः सिद्धिं समेताभ्यामुभाभ्यामन्वियेष सः ॥**

ह्या नीतिसूत्राचे आधारानें वागून शिवाजी स्वराज्य स्थापूं शकले ! शिवाजी शिवाजी होअूं शकले !!

---

— ५ —

# अटकेवर हिंदु विजयाचा भगवा झेंडा

'श्रद्धानंद'
१०-५-१९२८ अिसवी

## (पूर्वार्ध)

[ हिंदूंच्या अर्वाचीन अितिहासांतिल अत्यंत अभिमानास्पद दिवस तो होय कीं, ज्या दिवशीं अटकेवर हिंदु विजयाचा भगवा झेंडा पुनः रोविला गेला ! ]

हिंदूंच्या अर्वाचीन अितिहासांत, म्हणजे कमींत कमी गेल्या अेक हजार वर्षांत हिंदुमात्रास अत्यंत मंगलकारक, अत्यंत अभिमानार्ह आणि अत्यंत गौरवास्पद असा जर कोणता दिवस अुगवला असेल, तर तो तो होय कीं, ज्या दिवशीं हिंदूंच्या भगव्या झेंड्यास झुंजवीत नेअून, मुसलमानांच्या बादशाहीचे तुकड्यांमागून तुकडे अुडवीत, हिंदूंच्या साम्राज्याचे प्रांतांमागून प्रांत अिस्लामी राज्यसत्तेच्या गुर्मीच्या छाटून टाकलेल्या पंजांतून विमुक्त करीत, हिंदूंच्या विजयी सैन्यांनीं त्यास अि. स. १७५८ च्या अेप्रिल-मेच्या संधींत अटकेवर रोविलें !

अेकंदरींत पहातां दाहिर राजाच्या पराभवापासून म्हणजे आठव्या शतकापासून हिंदूंच्या पडत्या काळास आरंभ झाला. अफगाणिस्थानापासून तों बंगालच्या शेवटच्या नगरापर्यंत आणि काश्मीरपासून तों रामेश्वरपर्यंत हिंदूंची सारखी पीछेहाट होत होत सर्व हिंदूंची राजसत्ता मुसलमानांच्या हातीं गेली. जर या पराभवाचें अुट्टे हिंदूंना केंव्हांहि काढतां आलें नसतें तर हिंदु जातीस आणि हिंदु संस्कृतीस जगांत तोंड काढण्यास जागा अुरली नसती. जेथें तेथें सारखी हिंदूंचीच हार होत आली होती. त्यामुळें मुसलमानांसच नव्हे तर अुभ्या जगास सहजच असें वाटूं लागलें असतें कीं, हे हिंदु स्वभावतःच दुसऱ्यांचे दास होअून रहाण्यास योग्य आहेत. हिंदु संस्कृति ही मनुष्यमात्रास शेळपट, घरघालू, भित्रा आणि निर्जीव करणारी आहे. हिंदु हा जिवंत कलहांत मुसलमान

किंवा पोर्तुगीज किंवा अिंग्रज यांच्यापुढें टिकाव धरूं शकण्यास कधींहि सम
होणारा नसल्यामुळें, सृष्टीच्या निर्दय पण कार्यक्षम नियमाप्रमाणें तें हिंदु रा
राष्ट्रांच्या धुंर्जीत मेलेंच पाहिजे. मुसलमान तर अितकेंच म्हणून थांबेनात
त्यांचे सहस्रावधि मुल्ला आणि मौलवी मुसलमानांनीं हिंदूंवर मिळविलेल
अखंड जयाकडे बोट दाखवून सर्व जगास सांगूं लागले कीं, 'हे पहा!
हिंदु मुसलमानांपुढें जे गोगलगाय होअून जातात, ते कांहीं त्यांच्यांत ज
नाहीं म्हणून, मुसलमानांवर ते भोळसटपणें विश्वास टाकतात म्हणून, त्यां
सैन्यसंघटन ढिलें आहे म्हणून किंवा त्यांच्यांत आत्मनाशक दुष्ट रूढी शिरल
आहेत म्हणून नव्हे तर ह्या आनुषंगिक दोषांपेक्षां त्यांच्या प्रत्यक्ष मूलप्रकृतींत
अनुस्यूत असलेल्या न्यूनांमुळेंच होय. हिंदु सामरिक कूटनीतींत अक्षम, फू
पडलेला, असंघटित आहे, म्हणूनच तो मुसलमानांपुढें गोगलगाय झाला अ
नव्हे, तर हिंदु हिंदु आहे म्हणूनच तो मुसलमानांपुढें हतबल ठरतो आ
हिंदु हिंदु आहे तोंवर तो तसाच ठरणार! हिंदु मूर्तिपूजक आहे– मुसलमा
मूर्तिभंजक आहे. हिंदु हरला, मुसलमान जिंकला. अर्थात् मूर्तिपूजक ह
हरावयाचाच आणि मूर्तिभंजक हा जिंकावयाचाच! हिंदूंचा धर्म खोटा, हिंदूं
तत्त्वज्ञान फोल, हिंदूंचें रक्त निःसत्त्व म्हणून हिंदूंकडे देवानें स्वतःच पा
फिरविली आहे आणि त्यांना तो जय देत नाहीं. अहिंदूंना देव जय देतो, य
वरूनच अहिंदूंचा धर्म खरा; त्यांचें तत्त्वज्ञान सत्य; त्यांचें रक्त जिवंत न
जिवंत रहाण्यास योग्य! असा कोटिक्रम मुल्ला आणि मौलवी सरसकट क
लागले होते. अितकेंच नव्हे, तर त्यांच्या त्या पुष्पितवाक्विवादाचा पगड
पडून शेंकडों हिंदूंचा देखील बुद्धिभ्रंश होत चालला. मुसलमानांच्या प्रत्ये
समरविजयाबरोबर हिंदूंचा अेकेक राजमुकुटच चूर्ण होत असे. त्यांच
संस्कृतीच्या आत्मविश्वासाचा आणि हिंदुत्वाच्या जीवनाचाहि अेकेक धाग
तुटत जाअी. जर हीच स्थिति तशीच रहाती, जर रणक्षेत्रावर हिंदूं
पराजयामागून पराजयच येत रहाते, अहिंदूच काय पण सृष्टि देखील तिच
निर्घृण, निष्ठुर स्वभावानुरूप तशा अकर्मण्य आणि दुर्बल राष्ट्राकडे पाठ फिरवित
आणि त्याच्या भाळीं ' जिवनकलहांत मरणासच योग्य ' अशी मुद्रा ठोकू
त्यास काळाचे जबडयांत ढकलून देती! आज हें जगत् हिंदुशून्य होअून रहातें
हा देश स्वतःस हिंदूंचें हिंदुस्थान न म्हणवितां हिंदूंचें कबरस्थान म्हणविता

कारण कुणीं कांहींहि म्हटलें तरी ज्यास झगड्यांत झडगतां येत नाहीं आणि जिंकतां येत नाहीं त्यास जगांत जगतां येत नाहीं–येणार नाहीं! हा सृष्टीचा निष्ठुर नियम आहे. दुर्बलांनीं पंगु अिच्छेच्या गुलाबांच्या फुलांमध्यें 'झगड्यांत जो जिंकील तो जीवनांत जगेल!' हा निष्ठुर नियम खोदलेली ती निसर्गाची तलवार कितीहि झांकली तरी तिची जीवघेती धार आणि त्या निसर्गाचीं तीं 'red in tooth and claw' असणारीं रक्ताळ वाघनखें हीं कांहीं बोथट होत नाहींत! लपूंहि शकत नाहींत!

'शेवटीं न्यायाचा विजय होईलच! भगवान करील तें खरें!', 'भजन करीत बसूं या म्हणजे झालें!' अशा दुर्बलांच्या पंगु अिच्छांच्या गुलाबांत तीं निसर्गाचीं वाघनखें झांकूं पहाणाऱ्या अकर्मण्य हिंदूंच्याच पिढ्या जर वाढत जात्या तर, जर रणक्षेत्रांत हिंदूंना जिंकतांच येतें ना तर, हिंदूंना जगतांहि येतें ना, त्यांचा वेदान्त त्यांच्या वेदांचा खरोखरच अंत करणारा ठरला असता, जर त्या वेदास धनुर्वेदाचा पाठिंबा देणारा शिवाजी अि. स. १६२७ त जन्मास न येता!

पण हिंदूंच्या सुदैवानें तो शिवाजी जन्मास आला. अि. स. ७२७ पासून हिंदूंच्या पराक्रमास लागलेलें खग्रास ग्रहण बरोबर ९०० वर्षे टिकलें! पण ९०० वर्षें पराभवाच्या राहूच्या पोटांत खिचपत पडला, तरी तो हिंदूंचा पराक्रम पचून गेला नाहीं आणि अगदीं पिचूनहि गेला नाहीं! १६२७ त शिवाजी जन्मल्याघटीस त्या ग्रहणाच्या मोक्षकाळाचा पहिला विपल जन्मला. तो त्या वेळेस कोणास कळला नाहीं. केवळ अितिहासाच्या अुलट्या दुर्बिणींतून आज तो दिसूं लागला आहे. शिवाजीनें हिंदूंच्या स्वतंत्र साम्राज्याची संस्थापना केली. तो रणक्षेत्रांत अुतरला तेव्हां 'न्यायाचा जय होअीलच!' ह्या दैववादाची माळ घेअून न अुतरतां तीं निसर्गाचीं निष्ठुर वाघनखें घेअून अुतरला. 'रण-क्षेत्रांत जिंकील तोच जीवनक्षेत्रांत जगेल!' हा निसर्गनियम आहे ना? ठीक आहे, असेल! पण तो अमोघ आहे; तो अनुल्लंघ्य आहे. म्हणून त्याच्या त्या निष्ठुरतेस निष्ठुरतेनेंच तोंड देअून त्या 'red in tooth and claw' असणाऱ्या जीवनकलहाच्या वाघनखानेंच अहिंदु गर्वाच्या अफझुलखानास

मी चिरीन, ही हिंदुपराक्रमानें प्रतिज्ञा केली आणि भगव्या झेंड्याच्या तळाखालीं भयंकर मंगर माजलें !

लढाअीमागून लढाअी झाली; पण पूर्वी हिंदूंना जितक्या निश्चिततेनें अपजय येअी, तितक्याच निश्चिततेनें त्या दिवसापासून अहिंदूंना अपजय येत गेला. जेथें जेथें मुसलमान भेटला, मग तो मोंगल असो वा पठाण असो, सय्यद असो वा शेख असो–तेथें तेथें हिंदूंनीं–मग तो रजपूत असो वा बुंदेला असो, मराठा असो वा शीख असो–त्यास पिटून काढलें. केवळ मुसलमानांसच नव्हे तर अिंग्रज, पुर्तुगीज, डच–जो जो अहिंदु दिसला त्यास हिंदूंनीं होअून होअून टक्कर देअून रणक्षेत्रांत चारी मुंड्या चीत केलें. अशी चढती कला अटकेच्या विजयापर्यंत सारखी चालली. रणक्षेत्रांत जो जिंकील तोच जीवनक्षेत्रांत जगावयास योग्य ! या शत्रूंच्या रानटी परंतु अखंडनीय कसोटीप्रमाणें विजेता हिंदु जगावयास योग्य ठरला आणि म्हणूनच आजही तो जगलेला आहे आणि भविष्यकालींहि जगूं म्हणून म्हणत आहे.

**शिवाजीची जन्मघटी**—हिंदुपराक्रमाच्या सूर्याचें सातशें वर्षांचें खग्रास ग्रहण सुटण्याचा पहिला विपल होता. तेथून तें ग्रहण सुटत सुटत ज्या दिवशीं हिंदुपदपादशाहीचा मराठी घोडा अबदालीच्या सेनेस हाणीत, हटवीत, हुसकावीत अटकेस पोंचला त्या दिवशीं तें ग्रहण पूर्णपणें सुटून हिंदूंचा प्रताप आपल्या सहस्ररश्मींनीं पुन्हा प्रकाशूं लागला. म्हणूनच शिवाजीचा जन्मदिन आणि मुसलमानादिक अहिंदु सत्तेस धुळीस लोळवून अटकेपर्यंत अखिल हिंदुस्थानभर हिंदुराष्ट्राचें वर्चस्व स्थापन करणारा हा अटकेचा विजयादिन हे दोन्ही दिवस हिंदुमात्रास अभिमानास्पद आहेत.

## जयंती आणि विजयंती

पण त्यांतहि शिवाजीच्या जन्मदिनाहूनहि अटकेचा विजयादिन आपल्या हिंदूंच्या अितिहासांत अधिक तेजानें तळपत रहाणारा आहे. माधवाचार्य, हरिहर, बुक्क, श्रीशिवछत्रपति, राणा प्रताप, श्रीगुरुगोविंदसिंह, छत्रसाल अित्यादि तत्कालिन अनेक नेक हिंदु वीरांच्या जन्मदिनाचें महत्त्व तो दिवस अगवला तेव्हां अर्थातच त्या त्या पिढीस कळणारें नव्हतें, त्या दिवशीं अितर

किती तरी मुलें जन्मलीं होतीं ! अितिहासाच्या अुलट्या दुर्बिणीनें काय तें त्या दिवसाचें महत्त्व आज दिसूं शकेल आणि आपण त्या जयंत्या पाळतों हें ठीकच आहे; परंतु ह्या सर्व जयंत्यांस जे महावीर जन्मले त्यांच्या पृथक् पराक्रमाचें संभूयफलित ज्या दिवशीं दृग्गोचर झालें, त्यांच्या अनेक कष्टांचें ज्या दिवशीं सार्थक झालें, ज्या दिवशीं त्यांनीं हिंदुत्वाच्या गौरवार्थ आरंभिलेल्या शतकव्यापक महान् युद्धाचें सार्थक होअून रामेश्वरापासून अटकेपर्यंत हिंदुस्थानभर हिंदूंच्या देशावर हिंदूंची सत्ता गाजूं लागली तो अटकेच्या विजयाचा दिवस हा अुगवला तेव्हां ह्या मित्रांचेच नव्हेत तर शत्रूंचेहि डोळे दिपून जावेत अशा महान् तेजानें तळपत अुगवला ! प्रतिज्ञेहून पूर्ति ही जितकी अधिक आश्वासक आणि अभिमानार्ह असते, तितकीच जयंतीतिथीहूनहि अटकेची ही विजयंतीतिथि अधिक अभिमानार्ह आहे. बीजारोपणाचें साफल्य जसें फलांच्या घोंसांनीं वांकलेल्या तरूंत होतें, पेरणीच्या दिवसाचें साफल्य जसें फलर्तूच्या दिवसांत होतें, त्याचप्रमाणें वीर जन्मतिथींस ह्या वीरजयंतीतिथि सफल करतात. “ अरावणमरामं वा । जगदद्येति निश्चितः ॥ ” अशी घोर प्रतिज्ञा करून ठाणलेल्या झुंजींत ज्या तिथीस रावणाचीं दाही शिरें रामानें छाटलीं, त्या विजयतिथीनेंच जशी रामाच्या जन्मतिथीस शोभा आली, किंबहुना या विजयतिथीनेंच त्या जन्मतिथीस जयंती असें नांव सार्थपणें धारण करणे शक्य केलें, त्याचप्रमाणें सात पिढ्यांच्या हिंदु पराजयाचा सूड घेणाऱ्या हिंदु वीरांच्या अटकेच्या विजयानें, त्या सात पिढ्यांच्या जन्मतिथींना जयंत्यांचें वैभव अर्पण केलें. अेतदर्थ अर्वाचीन हिंदु अितिहासांत जो दिवस व ज्या घटना गौरवपर आहेत त्या सर्व दिवसांत आणि घटनांत अटकविजयाचा दिवस आणि घटना अत्यंत गौरवास्पद आहे. कारण त्या दिवशीं सातशें वर्षांनंतर मुसलमानांच्या हातून अुभें हिंदुस्थान जास्तींत जास्ती अंशांनीं विमुक्त होअून हिंदुपदपादशाहीचा अुंचांतील अुंच कळस अुभारला गेला !

काबूल आणि दिल्ली या दोन्ही अिस्लामी सत्तांच्या सवतींस खिळखिळया करून आमच्या मराठ्यांनीं पंजाब प्रांतासहि अटकेपर्यंत मोकळा केल्यानंतर, पुढें आमच्या हिंदु–शिखांनीं पंजाबांतून मुसलमानी राज्याचें नित्याचें अुच्चाटन करून, अटकेच्याहि पलीकडे अुतरून काबूल नदीवर हिंदूंचे ध्वज रोवले हें खरें; पण त्या वेळेस अिकडे दिल्लीच्या खालचा

हिंदुस्थान अेका नव्याच परकीय सत्तेचे—अिंग्लंडचे—हातीं पडला असल्यानें हिंदुसत्तेच्या अधिकांत अधिक विस्ताराच्या दृष्टीनें हा अटकदिवसच अग्रगण्य ठरतो.

खरोखर, महंमद गझनी सिंध ओलांडून आला त्या अि. स. ७३२ पासून जवळजवळ अेक हजार दोनशें वर काल गेला, त्यांत ज्या दिवशीं अहिंदूंना चौफेर सामन्यास तोंड देत आणि अबदाल्लीच्या पठाणांना सिंधुपार पिटाळीत हिंदुवीरांनीं स्वातंत्र्याचा जरिपटका अटकेवर फडकाविला तो १७५८ च्या अेप्रिल-मेच्या संधीचा आठवडा हा हिंदु पराक्रमानें आणि हिंदु गौरवानें गांठलेलें परमोच्च शिखर आहे ! त्या दिवशीं हिंदु शक्ति जितकी प्रखर तेजानें तळपली तशी आजपर्यंत पुनश्च कोणत्याहि दिवशीं तळपूं शकली नाहीं. यद्यपि यापुढें मात्र ती त्या दिवसापेक्षांहि अधिक तेजस्वी, ओजस्वी आणि यशस्वी होअूं अिच्छीत आहे.

तशी ती भविष्यकालीं व्हावी म्हणून ह्या अत्यंत शक्तिहीन आणि स्फूर्तिहीन वर्तमानकालाच्या विपारी वातावरणांतून अेक दिवसभर तरी निघून त्या भूतकालाच्या अत्यंत स्फूर्तिदायक वातावरणांत शक्तिसंचयार्थ श्वासोच्छ्वास करण्यासाठीं, आपण त्या अर्वाचीन हिंदु विजयाच्या स्मृतीच्या अत्यंत अुच्च, पूज्य आणि पवित्र शिखरावर आजचा आठवडा घालवूं या !

[ सन १७५९ च्या अेप्रिल-मे महिन्याचें वर्णन करतांना वीर सावरकर 'गोमांतक' काव्यांत लिहितात. ]

**॥ अैका अैका, हिंदुमात्र हो, वार्ता विजयाच्या आल्या ॥**
**॥ अुभ्या सात शतकांचा अुगवुनि सूड जिंकिलें जेत्याला ॥ १ ॥**

**॥ म्लेंच्छमदासी तुडवित पायीं मिरवित सोनेरी तोडा ॥**
**॥ पुनरपि आजी हिंदु जयाचा पिअी सिंधुचें जल घोडा ॥ २ ॥**

**॥ हिंदुविरांचा कीं श्रीशें असे यशस्वी हट केला ॥**
**॥ आज हिंदुचा जरिपटका कीं पुन्हां फडकला अटकेला ॥ ३ ॥**

---

— ६ —

# अटकेवर हिंदु विजयाचा

'श्रद्धानंद'
१०-५-१९२८ अिनवी

# भगवा झेंडा

## (अुत्तरार्ध)

ज्या दिवशीं मराठ्यांच्या सेना, त्यांचे सेनापति रघुनाथराव पेशवे यांचे हाताखालीं अटकेपर्यंत मुसलमानांस जिकीत गेल्या, त्या अेप्रिल-मे सन १७५८ मधल्या दिवसांचा अभिमान प्रत्येक हिंदुमात्रास असला पाहिजे. कारण तो विजय हिंदुमात्राचा होता. आम्ही महाराष्ट्राच्या काय किंवा बुंदेल्याच्या काय, रजपुतांच्या काय किंवा शिखांच्या काय–हिंदुस्थानांत हिंदु-जगत् आणि अहिंदुजगत् ह्यांत झालेल्या अनेक शतकव्यापी महायुद्धास अेकाच संकलित हिंदु अितिहासाचीं केवळ पृष्ठें समजतों. त्या अखिल हिंदु दृष्टीनेंच आम्हांस ह्या अटक-विजयाचा अत्यंत अभिमान वाटतो. कारण त्या दिवशीं हिंदु सत्ता प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणें सर्व हिंदुस्थानभर पुनरपि स्थापित झाली होती!

दक्षिणेकडून आरंभ करून सरासरी सन १७६० च्या वर्षाचें निरीक्षण करूं या. हें पहा त्रावणकोरचें राज्य; तें हिंदूच आहे. म्हैसूरचें अजून हिंदूंचेच हातांत होतें. अकोट-तंजावरपर्यंत लहानमोठीं राज्यें कांहीं प्रत्यक्ष, कांहीं अप्रत्यक्षपणें मराठ्यांचे कह्यांत होतीं. त्यापुढें कोंकणपट्टींत पोर्तुगीजांवर मराठ्यांनीं मोठा विजय मिळवून, त्यांस गोव्यापर्यंत मागें रेटलें होतें आणि कोंकण बहुशः आपल्या हिंदु राज्यांत समाविष्ट केलें होतें. महाराष्ट्र, अुभी गुजराथ, धार, अिंदूर, ग्वाल्हेर, बुंदेल खंड आणखी खालती नागपूर ते ओरिसापर्यंतच्या विस्तृत प्रदेशावर सलग आणि स्वतंत्र अशा मराठ्यांच्या हिंदुपदपादशाहीची प्रत्यक्ष सत्ता चालत होती. निजामचें तेवढें अेक मुसलमानी राज्य दक्षिणेंत होतें; पण त्यांतहि मराठ्यांच्या चौथाअीची

व सरदेशमुखीचीं नखें खोल रुतलेलीं असून, तें वस्तुतः अेक मांडलिक राज्य झालेलें होतें. ओरिसाच्यापुढें बंगाल. त्या बंगालच्या नबाबानें महाराष्ट्रीय हिंदुसत्तेस चौथाअीची लक्षावधि रुपये खंडणी देण्याचें मान्य करून त्याच वेळीं आपला जीव सोडवून घेतला होता. अशा रीतीनें राजपुतन्यापर्यंतचा प्रदेश प्रत्यक्ष मराठी हिंदूंचे राज्यांत मोडला गेलेला. राजपुताना पंजाबपर्यंत रजपूत हिंदूंच्या हातांत. जाटहि हिंदूच. दिल्ली मराठ्यांचे कह्यांत. पलीकडे नेपाळ हिंदूच. अयोध्येचा वजीर तेवढा अुरला. तोहि मराठ्यांच्या चौथाअीनें निजामाप्रमाणेंच नरम करून सोडलेला. मुसलमानी सत्ता अशी रामेश्वर ते दिल्लीपर्यंत बहुधा नांवाची देखील अुरली नव्हती. राहतां राहिला पंजाब.

मराठी सेनेपुढें चीत झालेल्या हिंदी मुसलमानांनीं मोठा कट करून पंजाबांतील राहिली-साहिली मुसलमानी सत्ता वांचविण्यास आणि हिंदूंच्या वाढत्या शक्तीस नाहींशी करण्यासाठीं अबदाल्लीला हिंदुस्थानांत बोलाविलें. अि. स. १७५६–७ त त्यानें पंजाब आपल्या हातांत घेतला, दिल्लींत प्रवेश केला. मथुरेपर्यंत हिंदु तीर्थांचा आणि क्षेत्रांचा विध्वंस करीत तो खालीं आला; परंतु मराठ्यांच्या मोठमोठ्या सेना दिल्लीकडे चालत येतातसें पाहून तो परत फिरला. त्याचे मनांत त्याचा मुलगा तैमूरशहा यास दिल्लीच्या सिंहासनावर बसवावयाचें होतें; पण सध्यां त्यास पंजाबचा प्रांत सांभाळण्यास नेमून अबदाल्ली परत गेला.

अितक्यांत मराठी सेना दिल्लीवर आल्या! सखाराम भगवंत, गंगाधर यशवंत अित्यादि मराठी सेनानायकांनीं दुआबांत प्रवेश केला आणि रोहिल्यांस आणि पठाणांस मोडून काढलें. विठ्ठल शिवदेव दिल्लीवर चालून गेले आणि अबदाल्लीच्या पक्षास पिटून दिल्ली हिंदूंचे हातांत घेतली. हिंदूंचा हाडवैरी नजीब अुद्दौला यास जिवंत पकडला आणि पंजाबवर स्वारी केली. सरहिंदला अबदुल सय्यद दहा हजार पठाणांनिशीं अबदाल्लीनें ठेवला होता. त्या दहा हजारांशीं लढाअी देअून त्यांच्या नायकाला मराठ्यांनीं पाडाव करून धरलें. ह्या मराठ्यांच्या अप्रतिहार्य बलापुढें टिकाव धरणें अशक्य पाहून हिंदुस्थानचा बादशहा होअूं पहाणारा अबदाल्लीचा पुत्र आणि प्रतिनिधि तैमूरशहा भिअून पळूं लागला. लाहोरांत मराठ्यांनीं विजयाच्या

दुंदुभि वाजवीत प्रवेश केला. तत्काळ ते पळत्या पठाणी सेनेवर चालून गेले. तैमूरची युद्धसामुग्री मराठ्यांच्या हातांत पडली. त्याचे शेंकडों लोक कापले गेले आणि प्रत्यक्ष शिबिर मराठ्यांनीं लुटून काढलें! अुभ्या हिंदुस्थानचा बादशहा होणारा तैमूर आणि ते पठाण जीव हातीं घेअून कसेबसे सिंधूपार झाले आणि हिंदूंच्या विजयी घोड्यानें सिंधूनदीपर्यंत चाल करून अटकेलाच काय ते आपले लगाम, आपले रश्मी ढिले केले. अेवंच मराठ्यांच्या हातांत पंजाब आणि मुसलमान सिंध ह्या दोन अुरलेल्या सुभ्यांचीहि सत्ता आली.

अशा रीतीनें त्रावणकोर ते नेपाळपर्यंत अुभें हिंदुस्थान वास्तविकतः हिंदूंच्याच सत्तेखालीं आलेलें होतें. त्रावणकोर, म्हैसूर, महाराष्ट्र, वऱ्हाड, ओरिसा, गुजराथ, काठेवाड, राजपुताना, अिंदोर, ग्वाल्हेर, नेपाळ हा प्रचंड प्रदेश तर संपूर्णपणें हिंदूंच्या राजसत्तेखालींच होता; निजाम, बंगालचा नबाब, अयोध्येचा वजीर त्यांस चौथाअी देत होते आणि दिल्ली ते पंजाबपर्यंतचा प्रदेश महाराष्ट्रीय हिंदु सेनापतीच्या सैनिक शासनाखालीं होता. अर्थात् अि. स. ७३२ पासून आज सन १९२८ पर्यंत हिंदूंच्या हातांत हिंदुस्थानचा जितका विस्तृत प्रदेश कधींहि आला नाहीं तितका अटक-विजयाच्या आठवड्यांत आलेला होता! हें स्पष्ट होण्यासाठीं त्या विजयी स्वारींतील हिंदु सेनापतींचींच अेक-दोन तत्कालीन पत्रें आम्ही आज प्रसिद्ध करीत आहोंत. तीं पत्रें अशीं :—

## रघुनाथरावांस अंताजी माणकेश्वरांचें पत्र

( हिंदूंचे सेनापति श्रीमंत रघुनाथराव ह्यांनीं लाहोरवर आक्रमण करून तो घेतल्याचें वृत्त कळल्यानंतर अंताजी माणकेश्वर ह्यांनीं जें त्या वेळीं पत्र लिहिलें आहे तें आम्ही खालीं देत आहों. ह्या पत्रावरून पृथ्वीराजानंतर हिंदूंचा विजयी अश्व पुन्हा जेव्हां त्या पवित्र पंचनद्यांच्या—पंजाबच्या प्रदेशांत दौडत गेला, त्या वेळीं प्रत्येक हिंदु अंतःकरणास कोण अभिमान वाटला हें वाचकांस दिसून हृदय गर्वानें अुत्तेजित होईल.)

अंताजी माणकेश्वर म्हणतो :—"सेवकास स्वामींनीं कृपा करून पत्र (१८ अेप्रिल १७५८ चें) पाठविलें तें पावलें. वर्तमान लाहोरच्या फत्तेचें, शत्रूच्या पारिपत्याचें व तिकडील मुलूख काबीज केल्याचें लिहिलें तें सविस्तर

वाचून परम आनंद झाला, तो पत्रीं कोठवरी लिहावा! हिंदुस्थानांत कीर्ति लौकिक मातबर जाली. कुलराजे, अुमराव, सुभे यांस दहशत पडली. सारे हिंदुस्थानचा सूड अब्दालीपासून अेक स्वामींनीं घेतला. तेणेंकरून यशाचे पर्वत जाले. स्वामी यशस्वीच आहेत. याचा विचार सेवकास लेखन करावयास सामर्थ्य केचें. वर्तमान वजीरांनीं अैकोन बहुतच हर्ष मानिला. स्वामी अवतारी पुरुष आहेत. त्यांची स्तुति मनुष्यांनीं काय करावी......जरी स्वामींची छावणी लाहोर प्रांतीं जाली तरी वजीर पातशहास घेअून छावणीस आपल्याजवळ घेअून येतो."

## राघोभरार्‍यांचें अटकेहून शनवारवाड्यास पत्र

(हिंदुपदपादशाहीची मर्यादा अटकेपार नेणारे हिंदूंचे सुप्रसिद्ध सेनानी श्रीमंत रघुनाथराव पेशवे ह्यांनीं खालील पत्र श्रीमंत नानासाहेब पेशव्यांस पाठविलें होतें. त्या वेळच्या मराठ्यांच्या मनगटांत केवढें दुर्दान्त सामर्थ्य व हृदयांत केवढी विश्वव्यापी महत्त्वाकांक्षा अुसळत होती हें हल्लींच्या कूपमंडूकवृत्तीच्या त्यांच्या वंशजांनीं नीट पारखून पाहावें!)

दि. ४-५-१७५८ दिवशीं रघुनाथराव पेशव्यास लिहितो :—लाहोर, सुलतान, काश्मीर वगैरे अटकेअलीकडील सुभ्यांचा बंदोबस्त करून अंमल बसवावा, त्यांस कांहीं जाला, कांहीं होणें तोहि लवकरच करितो. त्यमुर, सुलतान व जहानखान यांचा पाठलाग करून फौज लुटून घेतली. थोडीशी झडत पडत अटकेपार पिशावरास ते पोंचले. अब्दाली अिराणावर चालून गेला, त्याची फौज अिराणच्या पातशहानें लुटून घेतली. अब्दाली कंदाहारास आला, अिराण्याची फौज पाठलाग करीत आली आहे. जबरदस्तखान व मुकर्रबखान या प्रांतीचे सरदार व जामीनदार अब्दालीचे जबरदस्तीमुळें त्यास रुजूं होते, तेही बदलोन हंगामा करितात. हल्लीं रफीक होअून, सेवा करून दाखवूं, अब्दालीस तंबी करा अैसा त्यांच्या अर्ज्या आल्या आहेत. अब्दलीचा धर सुटला आहे. सारांश, त्याचा जोर तिकडून होतो अैसें नाहीं. तिकडून अिराणचे शहानें जेरदस्त केलें, अिकडून जोरा पोंचवून सरकारचा अंमल अटकेपार करावा. त्याचा पुतण्या व दौलतेचा वारस स्वामीपाशीं देशास आला तो स्वामींनीं आम्हांकडे पाठविला होता त्यास अटकेपलीकडे थोडीशी

जागा बसावयास देऊन अटकेपार काबुल पिशावरचा सुभा देऊं. अब्दालीच्या फौजेवर अब्दुल-समदखान सरहिंदेंत होता, तो सरकारांत पाडाव आहे. तो व आणखी या प्रांतींची फौज, अिराणी, मोंगल देऊन मशारनिल्हेची रवानगी करतों, हे तिकडील पैरवी करितील, स्वामीचे पुण्यप्रतापें अब्दालीस जोरा पोंचवून तंबी करितील, पारिपत्य अुत्तम प्रकारें करून अटकेपार अंमल बसवितील. लाहोर प्रांतीं रेणको अनाजी व रायाजी सखदेव असे ठेविले. गोपाळराव गणेश यांचाहि पैगाम आहे. तेहि रहातील. अिराणचे पातशहाचे स्वदस्तुरचे कागदहि आम्हांस व मल्हाररावास आले होते, कीं लवकर कंदाहारेस यावें आणि याचें पारिपत्य करून अटकेची हद्द करावी; परंतु आम्ही तरी काबुलचा सुभा अब्दुल रहिमखान स्वामींनीं पाठविला, त्यास देतों. फौज वगैरे थोडेंबहुत साहित्यहि करीतों. काबुल व कंदाहार हे अटकेपारचे सुभे हिंदुस्थानकडे अकबरापासून अलमगीर पावेतों होते, ते आम्ही विलायतेंत कां द्यावे? यास्तव तूर्त येथं सुभे देतां. त्यासही ( इराणचे शहास ) या सुभ्यांची दरकार नसेल. तो इराणचा अंमल करील. आम्ही कंधार पावेतों अंमल बसवून, तूर्त त्यास गोडच जाब पाठविणार आहों. जंबु, काश्मीर वगैरे तमाम वकील आले आहेत. मामलत थोडीबहुत अटकेअलीकडील करीत आहों. पलीकडील तूर्त होत नाहीं, खटपट मात्र होअील. तूर्त तांतडीमुळें जें होअील तें करितों. पुढील स्वारीस जो कोणी सरदार मातबर येअील तो बंदोबस्त करील. मुल्ख दोचौ करोडींचा वसुली, परंतु जमीनदार मवास मोठेमोठे आहेत. आम्ही नांवास मात्र खंडणी करितों. जेथें पंचवीस लक्षांचा मुल्ख तेथें अेक दोन लक्ष येणेंच कठीण आहेत. तूर्त माघारें फिरायचा डौल स्वामीचे आज्ञेवरून धरिला आहे. याजमुळें जें होतें तेंच करितों, तटीं लावीत नाहीं. तूर्त अदिनाबेगावरच सारा यखतियार दिल्हा आहे. त्यासच कमाविसिनें लाहोर, मुलतान दिल्हें आहे. यंदा तर सारें शिबंदीखालींच जाअील. शिबंदी वारतांच कठीण पडेल. दोन-तीन वर्षांनीं कांहीं सोअीस लागेल. स्वामींस कळावें.'

हिंदूंच्या ह्या गौरवाच्या दिवसाची स्मृति सर्व हिंदुमात्रानें आज अभिमानपूर्वक साजरी करावी. कारण, महाराष्ट्राच्या अेखाद्या प्रांतिक प्रश्नाकरितां नव्हे तर हिंदुपदपादशाहीच्या महान् ध्येयाकरितां महाराष्ट्रीय वीरांनीं तें प्रचंड युद्ध लढविलें होतें. दुसरें असें कीं, हिंदूंतीलच कांहीं राजांशीं किंवा लोकांशीं

मराठ्यांस लढावें लागलें. तरीहि त्या आपसांतील यादवीच्या प्रश्नाचा ह्या विजयाच्या राष्ट्रीय स्वरूपाशीं कांहीं संबंध पोंचत नाहीं. महाराष्ट्राच्या काय किंवा बंगालच्या काय—जेवढा हिंदु अितिहास आहे तेवढ्याचें सामष्टिक अवलोकन करूनच असल्या महान् हिंदु विजयाचें रहस्य जाणतां येतें—महत्त्व मापतां येतें. चंद्रगुप्त हा मगधाचा राजा. त्याचें साम्राज्य पंजाबपासून दक्षिणे-पर्यंत त्यानें स्थापिलें. अर्थात् आकुंचित प्रांतिक दृष्टीनेंच पाहिलें, तर पंजाबचा तो शत्रु ठरेल. महाराष्ट्रास चंद्रगुप्ताच्या विजयाचें अभिनंदन करण्याचे ठायीं त्याचा द्वेप करावा लागेल; पण अर्थात् ही भयंकर आणि राष्ट्रघातक चूक होअील. राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या दृष्टीनेंच चंद्रगुप्ताच्या दिग्विजयाकडे आणि अफगाणिस्थानापासून दक्षिणेपर्यंत अुभा हिंदुस्थान अेका प्रबळ संघटित कर-णाऱ्या त्यांच्या राष्ट्रीय साम्राज्याकडे आपण पहातों आणि त्याचा गौरव राष्ट्रीय गौरव मानतों. तीच स्थिति विक्रमाची किंवा श्रीहर्षाची. कनोजचा श्रीहर्ष आणि महाराष्ट्र-कर्नाटकचा पुलकेशी लढले; पण आपण आज राष्ट्रीय दृष्टीनें अुभयता-सहि आपल्या हिंदु-वैभवाचे स्तंभ समजतों. आज महाराष्ट्रास श्रीहर्षाचा आणि कनोजच्या हिंदूंस पुलकेशीचा अभिमान वाटत आहे. पृथ्वीराजानें अनेक रजपूत राजांवर स्वाऱ्या केल्या. गृहकलह झाले; पण तो घरगुती विचार. अखिल हिंदुदृष्टीनें महंमद घोरीशीं मरेपर्यंत जो पृथ्वीराज हिंदूंच्या साम्राज्याकरितां लढला, तो त्यानें ज्यांच्याशीं गृहकलह केले त्या हिंदूंनाहि हिंदुवीर म्हणून पूज्य आहे—असला पाहिजे. तीच मराठ्यांची, शिखांची, रजपुतांची, हिंदूंतील प्रत्येक अुपजातीची, अखिल हिंदुदृष्टीनें पाहिलें असतां महाराष्ट्र जसा अशोक, चंद्रगुप्त, विक्रम, राणा प्रताप अित्यादि थोर हिंदु वीरांस त्यांच्या जयास आणि अपजयास आपले वीर, जय आणि अपजय मानतो त्याचप्रमाणें महाराष्ट्रानें हिंदुपदपादशाहीच्या प्रस्थापनेसाठीं शिवाजीपासून अव्याहत जे परिश्रम केले आणि प्रचंड विजय मिळविले ते आपणां अखिल हिंदुस्थानांतील हिंदु-मात्रास अभिमानास्पद आणि ममत्वपूर्ण गौरवाचे वाटले पाहिजेत. हिंदूंतील कोणीहि थोर झाला तर त्यांतच प्रत्येक हिंदु अंशतः थोर होतोच. हिंदूंत कोणीहि स्वतंत्र झाला, तर त्यांतच प्रत्येक हिंदु अंशतः स्वतंत्र झालेलाच असतो.

हिंदुसंघटनाच्या सामष्टिक चेतनेनें अुदार अुत्स्फूर्ति पावलेल्या प्रत्येक हिंदु

हृदया! यास्तव हा अटकेचा विजय तुझा आहे. आजच्या स्थितींत त्याचें स्मरण कर! तुझा आत्मविश्वास प्रबळ होईल.

आणि हिंदूंच्या शत्रूंनो! तुम्ही कोणत्याहि जातीचे वा गोताचे वा देशाचे असा, तुम्ही जे कोणी हिंदूंस तुच्छ लेखीत असाल त्या तुम्हीहि ह्या अटकेच्या विजयतिथीकडे पाहून अेकदां तुमचे मदान्ध हिंदुद्वेषी डोळे त्या तेजानें दिपूं द्या! हा जातिभेद, 'हा विटाळ', ही दुही, ही फूट, ही अस्पृश्यता, ही शिवाशिव, हा धर्मभोळेपणा ह्या सर्व लटांबरांचा धोंडा गळ्यांत अडकविला असतांना देखील हा हिंदु पराक्रम तुमच्या बादशाहीस आणि शाहीस पायां-खालीं तुडवीत अटकेपर्यंत आपला विजयी घोडा फेंकीत गेला! मग आज तर आतां सर्व राष्ट्रघातक चालींचें लटांबर तो हिंदु पराक्रम दूर फेंकीत आहे! आज तो हातांत घेतलेल्या अेका शौर्याच्या तलवारीवांचून दुसरें कांहींहि ओझें जवळ न घेतां सड्या स्वारीनिशीं आपल्या न्याय्य अधिकारास जिकावयास निघू पहात आहे. ज्याला त्यांच्या वाटेंत आडवें यायचें असेल त्यानें विचार करून यावें!!

हिंदु भित्रा आहे? तो पहा अटकेवरचा शत्रूंच्या गर्वाच्या प्रेतांवर अुभारलेला त्याचा भगवा झेंडा. तो पहा वसअीवर पुर्तुगीजावर चालून जाणारा चिमाजी-अप्पा! जे पूर्वी बादशहा होते त्यांची हिंदूनें दाढी खेचून दिल्लीच्या सिंहासना-वर आपला पाय रोविला. वैदिक काळाच्या गोष्टी नाहींत; अगदीं कालची गोष्ट. आतां तर सर्व पूर्व वैरी त्यांच्या दुष्कृत्यांनींच हतबल आणि हीन झालेले आहेत. आतां तुमच्या पीरास तो वीर कसला भितो? पीरास न पाद्र्यास, न काळ्यास न गोऱ्यास, जो जो आड येअील त्यास परास्त केल्याविना आणि ह्या आपल्या हिंदुस्थानच्या अिंद्रप्रस्थीं, पुनरपि अिंद्राचेंच प्रस्थ स्थापिल्या-विना तो रहात नाहीं!

हिंदुद्वेष्टयांच्या हृदयांत ही प्रबळ भीति ह्या अटकेच्या विजयदिनाची स्मृति अुत्पन्न करो! आणि हिंदु हृदयांत त्या भीतीस सार्थ करील अशी कोण्या मोठ्या भीमपराक्रमाची जयिष्णु स्फूर्ति जागृत करो!!!

— ७ —

## मुसलमानांच्या खिलाफतीचा

# अुदय, ऱ्हास आणि विनाश

[ मुसलमानांच्या धर्मग्रंथाचें, अितिहासाचें आणि त्यांच्यांतील पंथोपपंथांचें साधार नि सत्य ज्ञान हिंदूंतील सुशिक्षित लोकांना तरी थोडेंबहुत झाल्यावांचून मुस्लिम समाजाच्या मूलभूत धार्मिक नि राजकीय मनोवृत्ति हिंदूंना केव्हांहि कळणार नाहींत आणि मुस्लिमांची ती कूटस्थ मनोवृत्ति तशी कळली नाहीं तोंवर मागें खिलाफत चळवळीची धोंड कॉंग्रेसच्या गांधीजीप्रभृति हिंदु पुढाऱ्यांनीं स्वतःच्या गळ्यांत बळेंबळें बांधून घेऊन जशी हिंदुत्वघातक नि राष्ट्रविनाशक घोडचूक केली तसे प्रमाद हिंदूंचे हातून वारंवार घडल्यावांचून रहाणार नाहींत. तसें घडूं नये म्हणून त्या खिलाफत चळवळीचे वेळीं वीर सावरकरांनीं हिंदूंना सावध करण्यासाठीं त्या खिलाफत चळवळीविरुद्ध अनेक लेख लिहिले. खिलाफतीचें मूळ अैतिहासिक स्वरूप कसें होतें तें हिंदूंना कळावें म्हणून हा खालीं दिलेला खिलाफतीचा अितिहास साधार सांगणारा लेखहि त्यांनीं सन १९२५-२६ मध्यें लिहिला. त्यात कांहीं वाक्यें न्यूनाधिक करून आम्हीं तो अैतिहासिक महत्त्वाचा लेख खालीं प्रसिद्धीत आहोंत.

कुराण शरीफचें अिंग्लिश भाषांतर करणारे सेलसाहेब, कुराणशरीफचें मुसलमानी दृष्टिकोणांतून अिंग्रजीमध्यें भाषांतर करणारे डॉ. महंमद, ' History of the Sarasens ', ' Spirit of Islam ' चे लेखक जस्टिस अमीरअली, ' Moors in Spain ' प्रभृति प्रमाणभूत ग्रंथांच्या नि ग्रंथकारांच्या अधिकृत वृत्तांतांना संकलून हा अैतिहासिक लेख वीर सावरकरांनीं लिहिलेला आहे.

—**प्रकाशक** ]

महंमद पैगंबर अुदयास येण्यापूर्वी साऱ्या अरबस्तानांत मूर्तिपूजक ( बहुधा शैव पंथानुयायी ) धर्माचा प्रसार झालेला होता. महंमदांचे वडील, चुलते, त्यांची कोरेश जातिहि त्याच मूर्तिपूजक पंथाची अनुयायी होती; परंतु महंमदांनीं

जेव्हां त्यांचा धर्मपंथ चालू केला तेव्हां त्या पंथांत मूर्तिपूजा निषिद्ध ठरविली गेली. त्यामुळें त्यांच्या कोरेश जातींतील आणि अितर अरब जातींतील मूर्तिपूजक धर्माच्या अनुयायांत फारच असंतोष माजला. महंमद पैगंबर स्वतःस मूर्तिभंजक म्हणून म्हणवितात; अितकेंच नव्हे तर आपल्या त्या वेळीं अगदीं थोड्याशा असलेल्या अनुयायांच्या बलावर गुप्त छापे घालून कोरेश लोकांच्या मक्केंतील कांहीं मूर्तिहि छिन्न-भिन्न करण्याचा क्रम त्यांनीं चालविला आहे असा जुन्या कोरेशप्रभृति लोकांनीं त्यांच्यावर आरोप ठेविला; परंतु त्यांस पकडण्यासाठीं जेव्हां सत्ताधीश शिपाअी आले तेव्हां महंमद पैगंबरांनीं आपला आवडता तरुण शिष्य अली यास आपले अंथरुणावर आपलें सोंग घेअून निजवून ठेवला आणि आपण स्वतः खिडकींतून अुडी टाकून बाहेर निसटून गेले.

## ‘ हिजरी ’ म्हणजे ‘ पलायन शका’चा आरंभ

ते अनेक यातना सोशीत लपत-छपत मदिनेस आले. या त्यांच्या पलायनाच्या वर्षापासूनच महंमदी हिजरी शक—म्हणजे ‘ पलायन शक ’ चालू झाला. कारण या वर्षी मदिनेस पोंचतांच त्यांनीं प्रकटपणें आपल्या धर्मप्रचारास आरंभ केला. अितकेंच नव्हे तर आपले मक्केंतील थोडेसे अनुयायी आणि मदिनेंतील त्यांस सहाय्य देणारे लोक यांचा अेक निराळाच जथा बनवून त्याचें अधिपत्यहि त्यांनीं आपल्याकडे घेतलें. या मक्केंतील ‘ मोहजरीन ’ म्हणजे पलायित आणि मदिनेंतील ‘ अनसार ’ म्हणजे मित्र, सहायक अशा लोकांच्या टोळीचे महंमद हे पैगंबर आणि राजे झाले. त्या नवीन जथ्याची धर्मसत्ता आणि राजसत्ता ह्या दोन्हीहि सत्ता अशा प्रकारें या अेकाच पुरुषाचे हातीं क्रमप्राप्तपणेंच अेकत्रित झाल्या. मदिनेंत महंमद पैगंबरांनीं “ आपण अीशप्रेषित पैगंबर ( दूत ) आहोंत ” अशी घोषणा करून आपल्या अनुयायांचे अेक संघटित संस्थान स्थापलें. जुन्या धर्माच्या मूर्तीहि फोडण्यांत आल्या.*

* The Right Honourable Justice Amir Ali, LL D. says in his book ‘The Spirit of Islam ’ ( P. P. 96 ) :—“ The idols of the nation were unrelentingly struck down. Sorrowfully, the idolators stood down and watched the downfall of the images they worshipped. Mohammed destroyed the ancient idols and abolished every pagan rite. ”

हें कळतांच त्यांच्यावर त्यांच्या जुन्या मताच्या कोरेश जातीचे लोकच नव्हत तर आजूबाजूच्या अनेक अरब जाती तुटून पडल्या. महंमद पैगंबर आणि त्यांच्या अनुयायांच्या त्या जुन्या धर्ममतांच्या अनुयायांशीं लहान लहान लढाया सारख्या चालूं लागल्या. त्यामुळें आपल्या अनुयायांचा धर्माधिपति किंवा राज्याधिपतिच न राहतां महंमद पैगंबर हे त्यांचे सरसेनाधिपतिहि झाले. लवकरच मक्काहि त्यांनीं जिंकली आणि मग आजूबाजूच्या प्रदेशास ‘ माझा नवीन धर्म तरी माना नाहीं तर युद्धास तरी सज्ज व्हा ’ असा संदेश धाडून त्यांनीं चढाअीचें धोरण स्वीकारलें. अेका साधारण सौदागराचा असा अकस्मात् अेक विजिगीषु राज्यधुरंधर नेता झालेला पाहून प्रत्यक्ष महंमद पैगंबराचे आयुष्यांतच त्यांच्या पैगंबरपणास खोटें पाडून ते ज्या शिडीनें या धाडसी वैभवास चढले त्याच शिडीनें आपणहि तेंच वैभव मिळविण्याची आकांक्षा धरणारे निदान दोन तरी साहसी पुरुष अरेबियांत अुदय पावले. त्यांनींहि हजरत महंमदाप्रमाणेंच “देवाचा खरा दूत मी, पैगंबर मी ” अशी घोषणा केली. त्यांनाहि अनुयायी मिळाले. या अल अस्वाद, मोसिलेमा अित्यादि महंमदांच्या समकालीन प्रतिस्पर्धी पैगंबरांपैकीं खरा पैगंबर कोण, देवाचा खरा दूत कोण हें स्वतःच प्रत्यक्षपणें खालीं येअून सांगण्याचा त्रास क्वचित् कार्यबाहुल्याचे योगें— देवानें न घेतल्यामुळें आणि असले प्रश्न सोडविण्यांत प्रत्यक्ष प्रमाणांनीं कधींच हात टेकले असल्यामुळें आपआपलें पैगंबरत्व सिद्ध करण्याचे कार्या तलवारीच्या कोटिक्रमावांचून दुसरा कोणताहि कोटिक्रम या सर्व स्पर्धाळू वीरांस अुरला नाहीं. त्या योगें त्यांचीं युद्धें होअून त्यांत पैगंबरपदावर अधिकार सांगणारे त्या काळचे अितर प्रतिस्पर्धी ठार झाले नि शेवटीं महंमदांच्या अनुयायांची तलवार विजयी होअून ‘ ज्याची तलवार त्याचें सत्य ’ अशा न्यायास मान तुकविणाऱ्या अरबांच्या झुंडीच्या झुंडी महंमदांस शरण येत चालल्या. अितक्यांत महंमद पैगंबर वारले. तेव्हां त्यांनीं स्थापिलेल्या या राज्याच्या आणि धर्माच्या धुरंधरतेचा अधिकारी कोण हा प्रश्न दत्त म्हणून अेकाअेकीं अुभा राहिला. महंमदांनीं अल्ली नांवाच्या आपल्या अेका अत्यंत लाडक्या मुलास स्वतःचा दत्तक मुलगा म्हणून मानलें होतें. पुढें त्यासच आपली मुलगी देअून जांवअीहि करून घेतलें आणि केव्हां केव्हां त्या आपल्या जांवयानेंच—अल्लीनेंच—आपल्या मागें आपलें अुत्तराधिकारी व्हावें अशीं वाक्येंहि

अुच्चारलीं होतीं. त्या अर्थी अल्लीनेंच मुसलमानांचें धुरीणत्व स्वीकारावें असें अेक पक्ष म्हणाला; परंतु महंमद पैगंबरांनीं अबूबेकर या धीरोदात्त शिष्यास कित्येक वेळां प्रार्थना चालविण्याच्या प्रमुखतेचा आपला मान स्वतःच दिलेला होता. त्यावरून त्या अबूबेकरासच पैगंगबराच्या अनुयायांचें धुरीणत्व द्यावें असें दुसरा पक्ष म्हणूं लागला. पैगंबराच्या और्ध्वदेहिक क्रियेच्या धांदलींत अल्लीप्रभृति त्याचें कौटुंबिक मंडळ गुंतलें असतां या दुसऱ्या पक्षानेंच घाअीघाअीनें सभा भरवून अबूबेकरला मुसलमानी धर्मपंथाचें पुढारीपण अर्पण केलें. झाली गोष्ट आतां मोडणें सोपें नव्हे, बरेंहि नव्हे, असें समजून अल्लीनेंहि शेवटीं त्यास मान तुकविली. अशा प्रकारें पैगंबराचा पहिला प्रतिनिधि अर्थात्

## मुसलमानाचा पहिला खलिफा अबुबेकर

हा झाला. खिलाफत संस्थेचाहि हाच अुगम. या वेळेपासून अल्ला (अीश्वर), पैगंबर (अीशप्रेषित) आणि खलिफा (पैगंबराचा प्रतिनिधि) अशी मुसलमानी धर्माची अधिकारपरंपरा प्रस्थापिली गेली. अर्थातच महंमद पैगंबरांत अेकीकृत झालेली धर्माध्यक्षत्वाची, राज्याध्यक्षत्वाची आणि सेनाध्यक्षत्वाची तिहेरी सत्ता त्याचा प्रतिनिधि जो खलिफा त्याच्यांतहि परंपरेनें अुतरली. ही तिहेरी सत्ता चालविण्याची योग्यता ज्यांत आहे, ज्यास हें खलिफाचें अत्युच्च पद शोभतें अशाच प्रकारचा मुसलमानांचा पहिला खलिफा अबुबेकर हा अेक थोर पुरुष होअून गेला; पण तो लवकरच वारला. त्यानें मरणाआधीं आपल्या मागें अुमर यानेंच खलिफा व्हावें असें सांगितल्यामुळें तो मरतांच अि. स. ६३४ मध्यें

## दुसरा खलिफा अुमर

हा झाला आणि अल्लीस पुन्हा मागें पडावें लागलें. हा अुमर मोठा पराक्रमी पुरुष होअून गेला. त्यानें मुसलमानी धर्माचा आणि राज्याचा झपाट्यानें प्रसार केला; पण शेवटीं तो अंतस्थ कटांत फसून सन ६४४ त मारेकऱ्यांच्या हातीं मारविला गेला. त्यानें मरतांना खलिफा नेमण्याचा अधिकार अेका सहा

जणांच्या निर्वाचक मंडळास दिला होता; पण त्या मंडळानें उस्मान नांवाच्या अेका ओमियेड जातीच्या पुरुपासच निवडिलें. तेव्हा

## तिसरा खलिफा ओमियेड जातीचा अुस्मान

हा झाला. त्यामुळें पैगंबराच्या त्या जांवयाच्या, अल्लीच्या, कोरेश पक्षास फार वाअीट वाटलें. अरेबियांत अनेक जाती वंशपरंपरेनें आपसांत लढत-झगडत आलेल्या होत्या. त्यांत पैगंबराची आणि त्याची मुलगी फतिमा ज्यास दिली होती त्या ह्या अल्लीची जात कोरेश. तिला आपलें खलिफापद ओमियेड जातीचे अुस्मानाचे हातीं पडलेलें सहन कसें व्हावें? नुसतें खलिफापदच नव्हे तर अुस्मानानें मुसलमानी सत्तेखालीं आलेल्या विस्तृत राज्यावरील झाडून साऱ्या अधिकारी स्थानांवर ओमियेड कुलांतील लोकच नेमण्याचा सपाटा चालविला. त्या कार्यी मरयान आणि मोअविया हे त्याचे दोन प्रबळ सहायकारी होते. या त्रिकूटाच्या जातीय छळास कंटाळून शेवटीं अल्लीच्या पक्षानें बंड केलें. अुस्मान खलिफा अकस्मात् मारला गेला आणि अल्लीच्या कोरेश जातीच्या पक्षानें शेवटीं अेकदाचें अल्लीस खलिफापदावर स्थापन केलें. मुसलमानांचा

## चौथा खलिफा अल्ली

हा होय. अल्ली हा खलिफा होतांच ओमियेड लोकांचा प्रबळ पुढारी मोअविया ह्यानें सीरियांत बंड अुभारलें. फार काय महंमदाची लाडकी धाकटी बायको सुद्धां महंमदाच्या या दत्तक मुलाच्या नि जांवयाच्या म्हणजे अल्लीच्या विरुद्ध बंडांत सामील झाली. मोअवियाच्या ओमियेड जातीच्या या बंडखोरांची सेना अल्लीवर चालून येतांना मोअवियानें अशी युक्ति केली कीं, आपल्या भाल्यास कुराण बांधून तो ध्वज सैन्यापुढें चालविला. त्यामुळें कुराण पहातांच अल्लीचे सैनिक त्या ध्वजाखालील सेनेवर हल्ला करीनासे झाले आणि अल्लीचे मनांत नसतांहि त्यास मोअवियाशीं संधि करणें भाग पडलें. तेव्हां खलिफा सर्व-संमत निवडणुकीनेंच निवडलेला असावा हें तत्त्व मान्य होअून पंच नेमले गेले; पण ते मोअवियाच्या हातांतील असल्यानें अल्लीची निवड होण्याचा मुळींच संभव दिसेना. अरबांच्या जातीजातींतील हीं भांडणें पाहून अुद्विग्न

झालेल्या कांहीं मुसलमानांनीं मध्यंतरीं तिकडे अेक निराळाच धाडसी कट केला आणि अली आणि मोअविया या दोघांचीहि हत्या करून ह्या पक्ष-भेदांचें मूळच अुखडून टाकावें म्हणजे सगळे मुसलमान अेक होअून निःपक्षपातें योग्य तो खलिफा निवडूं शकतील अशा हेतूनें त्यांनीं मारेकरी घातले. पण त्या छाप्यांत अली हाच तेवढा मारला जाअून मोआवियावरचा वार खालीं गेला ! अलीच्या हत्येनें त्याचा कोरेश पक्ष चिडून गेला. अलीचीं मुलं, अर्थात्च पैगंबराची मुलगी फतिमा हिचे पुत्र दोन : अेक हसन, दुसरा हुसेन. आपल्या अिकडे ताबूतांतून ज्यांच्या हत्येविषयीं अजूनहि लाखों मुसलमान प्रतिवर्षी शोक करतात ते हेच हसन–हुसेन होत. अलीच्या पक्षानें हसनला खलिफा केलं. मोआवियाच्या पक्षानें तें जुमानलें नाहीं. शेवटीं मोठ्या बंडाळीनंतर मोअवियाच्या प्रबळ शक्तीपुढें हसननें नमतें घेतलें; आपल्या खलिफापदाचें त्यागपत्र दिलें आणि दोन्ही पक्षांची तडजोड होअून असें ठरलें कीं, मोआवियानें प्रथम खलिफा व्हावें; परंतु मोअवियानंतर हुसेनला खलिफापद द्यावें. अशा प्रकारें ओमियेड आणि कोरेश या जातींचा अल्पकाळपावेतों का होअीना पण संधि होअून मुसल-मानांचा पुन्हा अेकदां अनन्य खलिफा नियुक्त झाला. तोच हा

## पांचवा खलिफा मोअविया

## बगदादच्या ओमियेड खलिफांच्या घराण्याचा संस्थापक.

त्यानेंच बगदाद ही आपली राजधानी केली. हा ओमियेड खलिफांचा वंश पुढें फार प्रबळ आणि वैभवसंपन्न असा झाला; परंतु तो वंश तसा स्थिर होण्याचे आधीं आणि स्थिर होण्यासाठींच मोअवियाला अनेक क्रूर कर्मं करावीं लागलीं. त्यानें खिलाफत आपले वंशांतच चालावी म्हणून संधि सांपडतांच पैगंबराचा वडील नातू जो वर अुल्लेखिलेला हसन त्यालाहि विषप्रयोग करविला. आणि धाकटा नातू जो हुसेन त्यालाहि बाजूस सारून करार मोडून आपला मुलगा येझिड यास आपल्या मागें खिलाफतीचा वारस ठरविला. त्याप्रमाणें मोअविया मरतांच सन ६८० त येझिड खलिफा झाला.

## सहावा खलिफा येझिड

हा खलिफा जितका पराक्रमी होता तितकाच विलासी होता. त्याला प्रबळ प्रतिस्पर्धी असा कोणीच न उरल्यानें तो मनः पूतं समाचरेत्। अशी धार्मिक नि राजकीय सत्ता साऱ्या मुस्लिम जगावर गाजवूं लागला. प्रति शुक्रवारीं तो मुसलमानांचा धर्माध्यक्ष या नात्यानें मशिदींत प्रार्थना चालवी; परंतु मुसलमानी धर्मांत त्याज्य मानलेले अनेक भोगाविलास तो उघड उघड भोगी. मद्यपानांत तो धुंद असे. त्याच्या या धार्मिक स्वैराचाराविरुद्ध जाणाऱ्या मौलवींची कुचेष्टा करण्यासाठीं तो अेका माकडास मौलवीसारखा वेष देअून आणि शोभिवंतपणें सजविलेल्या गाढवावर [‘On a beautifully caparisoned donkey,’ Amir Ali, Page 83] बसवून त्यास उघडपणे मिरवीत नेअी. त्यानें करारभंग करून मार्गे सारलेल्या हुसेनशीं येझिडला अर्थातच घोर संग्राम करावा लागला. शेवटीं

## करबेलाच्या प्रसिद्ध लढाअींत

पैगंबरांच्या त्या नातवाला त्याच्या अनुयायांसह अत्यंत क्रूरपणानें येझिडच्या मुसलमानी सैन्यानें ठार मारलें. महंमद पैगंबराच्या या प्रत्यक्ष नातवाचें डोकें कापून जेव्हां तें येझिडच्या ‘ओबेदुल्ला’ नांवाच्या करबेलाकडे लढणाऱ्या सेनापतीसमोर आणलें गेलें तेव्हां त्या येझिडच्या सेनापतीनें त्या त्याच्या मृतवदनाच्या ओठावर छडी घेअून सपासप मारलें. (Amir Ali, P. P. 86) याच ओठांचें लहानपणीं स्वतः पैगंबरानें चुंबन घेतलें होतें! अशी आठवण काढून शियापंथी मुसलमानांना अनावर शोक झाला परंतु येझिडचा क्रोधानल अेवढ्यानेंच शांत झाला नाहीं. हुसेनचा पक्ष घेणाऱ्या मदिना नगरावर त्यानें चाल केली आणि मुसलमानांच्या त्या खलिफानें मुसलमानांच्या त्या पवित्र महाक्षेत्राची

## त्या मदिना क्षेत्राची धुळधाण

करून टाकली. तेथील मशिदींच्या घोडशाळा बनवून टाकल्या! पण मनुष्यानें तर नव्हेच पण देवानेंसुद्धां येझिडचें कांहीं वांकडें केलें नाहीं. अुलट तो

सर्वत्र विजय पावत गेला. आपल्या मागें आपल्या मुलास खलिफा नेमून तो अि. स. ६८३ त मरण पावला.

ह्या ओमेडिया खलिफांच्या अनुयायांस 'सुनी' म्हणत; परंतु त्यांना महंमद पैगंबराच्या फातिमा नांवाच्या मुलीच्या त्या हसन–हुसेनचे अनुयायी 'खुनी' म्हणत. हुसेनच्या हत्येनंतर त्याच्या अनुयायांनीं सुनी लोकांतून नित्याचेंच फुटून सुनींच्या खलिफाप्रमाणेंच त्याचा प्रतिस्पर्धी असा अलीच्या वंशांतील 'अिमाम' ते नेमूं लागले. या वेळेपासूनच मुसलमानांत दोन तट नित्याचे पडले. ते सुनी आणि हे शिया. त्यांचा मुख्य खलिफा, यांचा मुख्य अिमाम. साऱ्या जगांतील मुसलमानांच्या अेककेंद्री खिलाफतीचे नि सत्तेचे येथून पुढें तुकडे तुकडे अुडत चालले.

## शिया पंथाचे अिमाम

हे अर्थात्च महंमदाची मुलगी फातिमा हिचे वंशज. त्या शियांच्या अिमामास म्हणूनच फातिमाअिड म्हणतात. हसन–हुसेनचा हा वंश. त्या अिमामांत कांहीं पुरुष खरोखरच फार विद्वान्, साधु नि देवलसी निघाले; परंतु सुनींचे खलिफा अत्यंत प्रबळ असल्यामुळें त्यांच्याकडून पिढ्यान् पिढ्या या अिमामांना फारच छळ सोसावा लागला. ह्या शियांच्या अिमामांना खलिफाचे अनुयायी केवळ तोतयेच नव्हत तर पापी मानीत. प्रत्यक्ष खलिफा प्रार्थनेच्या वेळीं या अिमामांवर शापांचा वर्षाव करून त्यांचा नायनाट करण्याची देवास राष्ट्रीय विनंति करी आणि देवांनींहि ती अैकली कीं काय न कळे; पण कांहीं पिढ्यांतच शियांच्या त्या अिमामांचा अगदीं नायनाट झाला खरा. कारण कांहीं कालानें सन ८७४ चे आगेमागें त्यांच्या शेवटच्या सत्ताधारी अिमामाला त्याच्या प्रतिस्पर्धी खलिफानें धरून नेलें आणि नाहींसा केलें. त्याचें अेक पांच वर्षांचें अर्भक–मूल–तेवढें मागें अुरलें होतें. तें अर्भक–मूल–अजाणपणें जो मार्ग दिसला त्या मार्गानें बाबा! बाबा! म्हणून हांका मारीत चाललें. पुढें त्याच मार्गानें अेक तांडा आला त्यांत तें मिसळलें आणि त्या तांड्याबरोबर आपल्या बापाला भेटण्यासाठीं जें गेलें तें गेलेंच! त्या अर्भक–मुला–चें कोणीं काय केलें असेल तें असो; पण तें पुन्हां कांहीं कोणाचे दृष्टीस पडलें नाहीं. ही करुण कहाणी जेव्हां शिया लोकांस कळली

तेव्हां त्यांच्या दुःखास पारावार राहिला नाहीं. त्या दुःखाचें सांत्वनाच अेकच मार्ग काय तो त्यांस अुरला होता. तो अवलंबून त्यांनीं असा विश्वास धरल कीं, त्यांचा तो बाल अिमाम सुनी लोकांच्या हातावर तुरी देअून अीश्वरानेंच नेला आणि त्यास कुठें तरी अजून सुरक्षित ठेवलेला आहे! संधि साधतांच तो शिया लोकांना मुक्त करण्यासाठीं अजूनहि परत येणार आहे! ही घटन अि. स. ७८४ चे जवळपास झाली. पुढें शेंकडों वर्षें अुलटून गेलीं तर शियांचा तो प्रेमळ विश्वास डगमगला नाहीं. मधून मधून कोणी भुमका अुठविली कीं, 'तें मूल परत येत आहे' कीं त्यासरशीं हजारों शिया लोक लांबवरून येअून त्या तांड्याच्या मूळच्या मार्गावर जमत नि संध्याकाळपर्यंत आपल्या त्या बाल अिमामाची परत येण्याची वाट पहात बसत. संध्याकाळी त्यांच्या त्या आतुरतेच्या दृष्टीस निराशेच्या रात्रींत कांहीं दिसेनासें झालें म्हणजे शोक करीत ते परत जात! आजहि लाखो शिया मुसलमानांचा हा विश्वास आहे कीं, आज नाहीं अुद्यां तो बाल अिमाम परत येअील आणि पृथ्वीवर शियांचा धर्म नि राज्य स्थापील! यास्तवच ते त्यास "मुताझार" (प्रतीक्षित) नि "फातम" (सत्) – 'असलेला' – असें संबोधितात. शियांचें आपल्या अिमामावरील हें करुणमनोहर प्रेम पाहून कोणालाहि कौतुकच वाटेल. मुसलमान लोक जर हिंदूंतील अशाच अनेक प्रेमळ समजुतींच्या आणि भक्तिमनोहर विश्वासांच्या गाभ्यांत अंतर्हित असलेल्या अुदात्त मनोवृत्तीस दुखवून त्यांना मूर्ख भाबडेपणाचा दोष देण्याची आणि आपण मात्र त्यापासून अलिप्त असण्याचा दंभ मिरविण्याची खोड सोडतील तर त्यांच्या अशा निष्ठांनाहि दुसरे कोणी भाबडेपणा म्हणून अुपहासणार नाहींत. अुलट मनुष्यस्वभावाच्या ह्या कोमल वृत्तींतील वत्सल नि भक्तिरसाचा आस्वाद सद्गदित हृदयानें घेतच रहातील!

## अन्योन्य प्रतिस्पर्धी खलिफांचें पीक!

शियांच्या 'अिमाम' शाहीची ही दुर्दशा उडत असतां तिकडे सुनींच्या खिलाफतींतहि सारखी धुमश्चक्री चालू होती. वर वर्णिलेली ओमियेड जातीच्या खलिफांची बगदाद येथें जी खिलाफत होती तिला त्या ओमियेड जातींतीलच मरवान आणि त्याचा मुलगा अबदुल मलिक हे भयंकर

प्रतिस्पर्धी उत्पन्न झाले. तेहि स्वतःस खलिफा म्हणवीत आणि दमास्कस येथें स्वतंत्रपणें राज्य करीत. ह्या अबदुल मलिकनें मक्केमध्यें तिसरा अेक खलिफा म्हणून जो गाजत होता त्या अबदुल्लावर चाल केली. बगदादचा खलिफा येझिड याच्या मुसलमानी अनुयायांनीं मुसलमानी धर्मक्षेत्र जें मादिना हिची जशी मागें विटंबना केली तशीच आतां दमास्कसचा खलिफा अबदुल मलिकनें मुसलमानांचें

## दुसरें धर्मक्षेत्र जें मक्का त्याचीहि विटंबना

केली. मशिदींना घोडशाळा बनविल्या. साऱ्या नगराची लूट केली. शतावधि मुसलमानांना कापून काढलें. जे खलिफ आपल्याच मुसलमानी धर्मक्षेत्रांची अशी विटंबना करीत आणि राज्यलोभापायीं किंवा धर्मवेडापायीं पिसाळून जे मुसलमान मुसलमानांचीच अशी निर्घृण कापाकापी करीत तेच मुसलमान पारसिकांच्या किंवा हिंदूंच्या देवस्थानांची राक्षसी विटंबना करण्यास कचरले नाहींत यांत काय आश्चर्य! धर्मवेडाचें आणि असहिष्णु क्रूरतेचें हें बाळकडू त्यांच्या धर्माच्या आरंभापासूनच ते पीत आलेले होते!

## दमास्कसचे ओमियेड खलिफा

वरील अबदुल मलिकनंतर वालिद हा दमास्कसचा खलिफा झाला. मुसलमान आपसांत कितीहि भांडत असले तरी परधर्मीय लोकांवर स्वाऱ्यामागून स्वाऱ्या करून त्यांनीं मुसलमानी धर्माचा आणि राज्याचा प्रसार चालविण्यांत लवलेशहि कसूर केलेली नव्हती. पारसिकांचें विस्तृत साम्राज्य नाशून, त्यांस मुसलमान करून ते सिंधुनदी अिकडे ओलांडीत होते तर या दमास्कसचे वालिद खलिफाचे राजवटींत ते तिकडे उभें आफ्रिका खंड पादाक्रांत करून अटलांटिक महासागरात जाऊन भिडले होते. असें सांगतात कीं,

## आफ्रिका खंडाचा विजेता तारीक

हा वादळासारखा पुढें घुसत घुसत जेव्हां शेवटीं अटलांटिक महासागर त्यास अकस्मात् आडवा आला तेव्हां त्याचा घोडा थयथयाटत तसाच पुढें घुसूं

लागला. त्याचे गळ्यापावेतों पाण्याची लाट आली तेंव्हांच काय तें त्या सेनापति तारीकनें त्यास मागें खेंचलें आणि तो दुःखित मनानें म्हणाला; " अरेरे! ह्या सागरानें केवढा घात केला! जर हा जलनिधि आडवा येता न तर हा माझा विजयी अश्व समोरचा तो सूर्य मावळतो तिथपर्यंत जाऊन पृथ्वीच्या त्या दुसऱ्या टोंकावरच काय तो विश्राम पावता!" असें म्हणत त्यानें पश्चिम दिशा सोडली आणि किंचित् उत्तरेच्या रोखानें ससैन्य निघाला तो स्पेनची सामुद्रधुनी उतरून स्पेनवर जाऊन आदळला. जिथें तो अरब विजेता तारीक स्पेनांत उतरला त्यास अजूनहि जेबल अि तारीक ( जिब्राल्टर ) तारीकची टेकडी, असें म्हणतात.

आफ्रिका खंड पादाक्रांत करणारीं मुसलमानी सैन्यें नुसता ते प्रदेशच मुसलमानी राज्यांस जोडीत जात नसत तर त्या लक्षावधि लोकांसहि स्वेच्छेने वा बळानें वा छळानें मुसलमानी धर्मांत ओढीत जात. शत्रूंच्या पाडाव केलेल्या पुरुष-स्त्रिया मुसलमानी सैन्यांतील सैनिकांत दासदासी म्हणून वांटून देण्याचा आपला हक्क पैगंबरास 'रुजू' आहे असें ते मानीत आणि महंमदापासून ते तसेंच वागतहि आले होते. आफ्रिकेंत तर कांहीं राजांपासून खंडणी जी घेत तीच मुळीं अर्धे रुपये आणि अर्ध्या स्त्रिया अशी नाण्यांत ठरत असे ह्या हजारों स्त्रिया मुसलमानी सैन्यांत लुटीचें धन म्हणून वांटल्या जात आणि त्यायोगें त्या देशांतील नवी पिढीचे पिढी जन्मतःच मुसलमानी धर्मांत जन्मे. ज्याच्या राजवटींत मुसलमानी लाट अशी स्पेनपर्यंत पसरली तो दमास्कसचा हा खलिफा वालिद सन ७१५ त मरण पावला.

या वालिदनंतर ह्या ओमियेड खलिफाच्या दमास्कस आणि बगदाद येथील दोन्ही राजधान्यांत विक्रमापेक्षां विलासांत आणि विक्षिप्तपणांतच अधिक नांवाजलेले खलिफा बहुधा होत गेले. अेका खलिफाची गोष्ट अितिहासांत अशी सांगतात कीं, त्यास दारूच्या व्यसनानें अितकें घेरलेले असे कीं, सर्व मुसलमानी जगताचा प्रार्थना चालविणारा प्रमुख म्हणून तो धर्माध्यक्ष जेव्हां प्रार्थनेस अुठे तेव्हां निशेंत चूर झाल्यामुळें वारंवार खालीं पडे. अेकदां तर त्यास बळें बळें अुभें करण्यांत आल्यानें तो प्रार्थनेच्या मंत्राचे जागीं मोठ्यानें प्रार्थिता झाला कीं, " हे देवा! मला थोडी अधिक

दारू दे!!" खलिफा दुसरा वालिद यानें तर अेकदां शुक्रवारीं प्रार्थनेस जाण्याचा कंटाळा आल्यानें आपल्या अेका सुंदर नाटकशाळेसच खलिफाचीं आपलीं वस्त्रें लेववून प्रार्थना चालविण्यास आपल्या स्थलीं धाडली आणि तिच्या प्रमुख पौरोहित्याखालींच त्या दिवशींची प्रार्थना तिनें चालविली आणि मुसलमानांनीं आपल्या गुरुनिष्ठेस बट्टा लागूं नये म्हणून ती अनुवादिली! (Ameer Ali, P. P. 196). अितिहासांतील बहुतेक प्रसिद्ध राजवंशांची होते तशी ओमियेड खलिफांची ही अशी सारखी अवनति होत चालली.

शेवटीं महंमद पैगंबराच्या कोरेश जातीनें त्यांच्या हातून पूर्वी अल्लीच्या वेळेपासून खिलाफत हिसकून घेणाऱ्या ह्या ओमियेड जातीचा सूड अुगविण्याची संधि साधून घेतली. पैगंबराचा चुलता अबास यांच्या वंशांतील अबदुल अबास ह्या धाडसी पुरुषानें आपल्या कोरेश जातीस संघटित करून दमास्कसचा ओमियेड जातीचा शेवटचा खलिफा अिब्राहिम यास पकडलें आणि चुन्याच्या तोबऱ्यांत त्याचें तोंड कोंबून त्यास हालहाल करून ठार मारिलें. त्याच्या कुटुंबांतील आणि अनुयायांतील ओमियेड जातीच्या लोकांचीहि अशी क्रूरपणें कत्तल केली. मग तो बगदादवर चालून गेला. तेथील ओमियेड खलिफांचा वंशहि असाच अुद्ध्वस्त करून त्यानें ७४९ अिसवींत आपल्या कोरेश जातीच्या अबासाअिड वंशाची स्थापना केली.

## अबासाअिड खलिफा

दमास्कस नगर सोडून या अबासाअिड खलिफांनीं बगदाद येथें आपली राजधानी आणली. सिंधूपासून स्पेनपर्यंत विस्तारलेल्या मुसलमानी साम्राज्याचें अधिपत्य या खलिफांनीं गाजविलें. या वंशांत अबदुलचा पुत्र मनसूर, त्याचा पुत्र महादी, त्यानें नियुक्त केलेला हरून रशीद हे मोठे बलाढ्य नि भाग्यशाली खलिफा होअून गेले. अरेबियन नाअिटच्या प्रसिद्ध कादंबरींतील खलिफा हेच होत; परंतु अुत्तरोत्तर ते क्षीण होत जाअून त्यांचे प्रतिस्पर्धी खलिफा खालीं वर्णन केल्याप्रमाणें अुत्पन्न नि प्रबळ होअून आणि मुसलमानांत अनेक पंथांची वीण वाढत चालल्यामुळें त्यांना यादवीचा दुर्धर क्षयरोग लागून हा वंश अितका पतित झाला कीं, त्यांच्या

अरब जातींतील कोणाहि पक्षावर किंवा मनुष्यावर त्यांच्या खलिफांना आपल्या संरक्षणासाठीं विश्वास ठेवतां येअीना. आपसांतील जातिवैमनस्या-मुळें कोणचें अरबी सैन्य कोणच्या अरबी सैन्यावर तुटून पडेल याचा कांहीं नियम अुरला नाहीं. यांतून मार्ग काढण्यासाठीं अेकच तोड अुरली होती ती म्हणजे जे अरबहि नाहींत आणि मुसलमानहि नाहींत असले नुकतेच अुदय पावत असलेले परस्थ आणि परकीय तुर्क लोकांचें सैन्य आपल्या संरक्षणासाठीं चाकरीस ठेवणें ही होय. हें तुर्क सैन्य मुसलमान नव्हतें. त्या वेळेपर्यंत तुर्कांनीं मुसलमानी धर्म स्वीकारलेला नव्हता. त्यामुळें खिलाफतींतील अरबी वंशांच्या भानगडींचें त्यांना कांहींच सोयरसुतक नसे. मुसलमानांतील जो पक्ष त्यांना पैसे देअी त्याचे वतीनें ते वाटेल त्या अितर पक्षाशीं लढत. अशा तुर्की सरदारांचे हातीं ह्या अरेबियन दुबळ्या खलिफांचें सर्व भाग्य जातांच खलिफा म्हणजे त्यांच्या हातांतलें अेक बाहुलें होअून बसलें. खलिफा वासिक हा मरतांना जेव्हां म्हणाला, ‘ माझे मागें माझा लहान पुत्र खलिफा व्हावा ’ तेव्हां ह्या अमुस्लीम तुर्क सरदारांनीं त्यांना झुगारून दिलें. कारण, तो अक्ष तुर्क सरदार म्हणाला, ‘ खलिफाचा तो धाकटा मुलगा खलिफा होण्यास अेवढ्यासाठीं अयोग्य आहे कीं, महंमद पैगंबरापासून त्याचा जो राजदंड, मुकुट नि झगा प्रत्येक खलिफाला घालावा लागे तो झगा त्या मुलास फार मोठा होअील!” ( Amcer Ali, P. P. 289 ) त्या आडदांड तुर्काचा हा नकळत विनोद किती मर्मज्ञ होता!

तथापि पुढें पुढें अनुभवानें तुर्कांचा कल या वरील आक्षेपाच्या अगदीं अुलट होत चालला. जणुं काय तो पैगंबरापासून खलिफांच्या अंगावर अुतरत आलेला झगा लहान मुलासच बेताचा होतो असें त्या तुर्कांना आढळून आलें! कारण लहान मुलेंच खलिफापदावर स्थापण्याचा तुर्क सरदारांनीं पुढें पायंडाच पाडला. खलिफाचे मोठ्या वयाचे वंशज जरी असले तरी त्या सर्वांना दूर सारून कुठल्या तरी नात्यांतलें लहान मूलच आणून तुर्क सरदार त्याला खलिफा करूं लागले. कारण अुघडच होतें कीं, लहान खलिफाचे संरक्षक म्हणून तुर्कांचे हातीं आलेला अधिकार त्यांना बजावतां यावा आणि सारी राज्यसत्ता त्यांच्या हातीं परंपरेनें चालावी. शेवटीं त्या तुर्कांची पीडा अितकी परमावधीला गेली कीं, ८६९ सनांत सेनेचा पगार दिला नाहीं म्हणून मुताझ

ह्या खलिफास तुर्कींनीं फरफटीत वाड्याबाहेर खेंचलें, त्याला पदच्युत केलें, तुरुंगांत कोंबलें आणि ठार मारून टाकलें. कोरेश जातीच्या अबासाअिड खलिफांची त्यांच्या राजधानींत ही निर्भर्त्सना चालली असतां तिकडे त्यांचे प्रतिस्पर्धी खलिफाहि त्यांना खाअूं का गिळूं करीत होते. त्यांपैकीं

## स्पेनचे ओमियेड खलिफा

हे अत्यंत प्रबळ नि वैभवशाली होते. वर सांगितलें आहे कीं, दमास्कस आणि बगदाद येथील पहिल्या ओमियेड खलिफांची या कोरेश जातीच्या अबासाअिड खलिफांनीं कत्तल केली. त्या धांदलींत पूर्वी अबदुल रहिमान नांवाचा त्या ओमियेड खलिफांच्या वंशांतील अेक पुरुष मोठ्या साहसानें स्पेनकडे निसटून गेला होता. त्यानेंच स्पेनमध्यें मुसलमानी विजय पुरा करून ९७१ त तेथें आपली ओमियेड वंशाची स्वतंत्र खिलाफत स्थापिली. हे स्पेनचे ओमियेड खलिफा युरोपला थरथर कांपवीत. ह्यांनींच मुसलमानी अर्धचंद्र फ्रान्सच्या राजधानीपर्यंत फडकावीत नेला. तिथें मात्र मुसलमानी विजयाची अप्रतिबंध लाट ख्रिस्त्यांनीं शेवटीं थांबविली. चार्लेस मार्टेल—ज्याला ख्रिश्चन मोठ्या गर्वानें Hammerer 'घणधारी' म्हणतात—त्याच्या घणाखालीं फ्रान्समध्यें मुसलमानी आक्रमण शेवटीं चक्काचूर झालें. दोन शतकें आपल्या वैभावानें आणि सौंदर्यानें युरोपभर गाजलेल्या ह्या खलिफांच्या स्पेनमधील त्या दोन सुंदर राजधान्या-कार्दोवा नि तालेडो नगरी ह्या शेवटीं अितक्या दुबळ्या झाल्या आणि मी खलिफा कीं तूं, ही बाचाबाची ह्या राजवंशांतहि अितकी माजली कीं, अेक खलिफा स्पेनमधील ख्रिश्चन संस्थानांपैकीं अेकाचें सहाय्य घेअी तर त्याचा प्रतिस्पर्धी दुसरा खलिफा दुसऱ्या ख्रिस्ती सरदाराचें! शेवटीं १४९८ अिसवीमध्यें स्पेनमध्यें अेका ख्रिस्ती संस्थानानें मोठी अुठावणी करून

## स्पेनमधील मुसलमानी सत्ताच नव्हे तर मुस्लिम धर्महि नामशेष करून टाकला

आणि तोहि अेखाद्या नाटकी थाटानें! त्या ख्रिस्ती विजेत्यानें अेक दिनांक ठरविला..स्पेनमधील यच्चावत् मुस्लिमांना अेक आज्ञा सोडली कीं, त्या

दिनांकाचे आंत अेक तर ख्रिस्ती धर्म स्वीकारा नाहीं तर स्पेन सोडून चालते व्हा! तेव्हां सहस्रावधि मुसलमान ख्रिस्ती झाले. जे अुरले त्यांना स्पेनमधून हुसकून दिलें आणि ज्यांनीं प्रतिकार केला त्या मुसलमानांना सरसकट कापून काढलें! त्या ठरलेल्या दिनांकाला स्पेन असें अगदीं निर्मुस्लिम होअून गेलें कीं, जणूं काय तीन शतकें तिथें मुसलमानांचें प्रबळ राज्य म्हणून कधीं झालेलेंच नव्हतें!

अिकडे अेशियांत मागें सांगितल्याप्रमाणें अि. स. ८७४ नंतर शियांचे अिमामांचा जरी पुरता विद्ध्वंस झाला होता तरी हसन-हुसेनची माता आणि महंमद पैगंबरांची मुलगी जी फतिमा तिच्या वंशांत जन्म पावल्याचा अधिकार सांगणाऱ्या महादी नांवाच्या अेका पुरुपानें बंड अुभारून, बगदाद येथील अबासाअिड खलिफांचे विरुद्ध अिजिप्तमध्यें आपली शियांची अेक स्वतंत्र खिलाफत स्थापन केली. तेव्हांपासून

## अिजिप्तमध्यें फतिमाअिड वंशाचे खलिफा

राज्य करूं लागले. या वंशांतहि कांहीं प्रबळ नि थोर पुरुप खलिफा होअून गेले; परंतु मध्यंतरीं बगदादमधल्या खलिफांच्या राज्यांत ज्याप्रमाणें तुर्की लोकांनीं सर्वसत्ता हिसकून आपल्या हातीं घेतली होती त्याच पद्धतीनें या अिजिप्तच्या खलिफांची सर्व सत्ता अितर तुर्की सरदारांनीं बळकावून टाकली. याचे आधींच राज्यलोभानें आणि संधिसाधुपणामुळें अनेक तुर्की सरदार नि त्यांचे अनुयायी ह्यांनीं मुसलमानी धर्म स्वीकारला होता. त्यांपैकीं कांहींनीं स्वतःस सुलतान (स्वतंत्र राजा) अशी पदवी घेअून स्वतःच राज्यपद स्वीकारलें आणि अल्पवयी खलिफा हे त्यांच्या हातांतील केवळ बाहुलीं बनून गेले. बगदाद, दमास्कस, अिजिप्त, स्पेन प्रभृति स्वतंत्र राजधान्यांतील हे मुसलमानी सुलतान नि खलिफा आपआपसांत झुंजत असतां तिकडे तार्तरी देशांत जें अेक भयंकर वादळ अुठलें होतें त्याच्या सपाट्यांत तीं सारीं मुसलमानी दुबळीं राज्यें अकस्मात् सांपडलीं. हें वादळ म्हणजे

## चेंगिझखानची स्वारी

ही होय. चेंगिझखान स्वतः मुस्लीम धर्माचा नि राज्याचा कट्टर द्वेष्टा होता.

बहुतेक अेशिया आणि अर्धा युरोप त्यानें आपल्या वज्रपातासारख्या आदळणाऱ्या तार्तार सैन्याच्या स्वातंत्र्याखालीं चिरडून टाकला होता. दमास्कस आणि बगदाद या मुसलमानांच्या दोन्ही राजधान्या त्यानें मातीस मिळविल्या. मुसलमानी राज्यांच्या चेंगिझखानानें अुडविलेल्या दुर्दशेचें वर्णन ह्याच ग्रंथाच्या लेखांक २ नि ३ मध्यें दिलेलें आहेच.

## तुर्की सुलतान

चेंगिझचें हें प्रलंयकर वादळ अुपशम पावून जेव्हां आशिया खंड पुन्हां दृष्टिगोचर झालें तेव्हां पहातात तों अुभ्या मुसलमानी जगतांत खलिफा असा अुरला नाहीं. कांहीं वर्षें अशींच खलिफाविना गेल्यानंतर अिजिप्तच्या सुलतानानें अबिसियाड वंशांतील जो अेक दूरचा पुरुष चेंगिझच्या कत्तलींतून वांचला होता त्यास मोठ्या प्रयासानें अिजिप्तला आणविलें नि मुसलमानांनीं त्यास खलिफा म्हणून मानून १४६१ च्या वर्षी मोठा अुत्सव केला; पण ह्यापुढें खलिफा म्हणजे केवळ अेक निःशक्त, निस्सहाय्य नि निर्माल्यवत् झालेला धर्माचार्य होता. सुलतानांच्या राजसभेची अेक शोभा नि त्यांच्या लहरीवर नाचणारा अेक तरंग होता. सोळाव्या शतकामध्यें तुर्की सुलतान सेलिम ह्यानें अिजिप्त घेतल्यानंतर ही शोभाहि ठेवणें बंद केलें नि त्या खलिफाकडून खिलाफतीचे सर्वाधिकार आपल्याकडे लावून घेतले. तेव्हांपासून पुढें तुर्कस्थानचे सुलतान हेच मुसलमानांचे खलिफा समजले जाअूं लागले.

## सुलतानपदाचा नि खिलाफतीचा संपूर्ण अुच्छेद

शेवटीं गेल्या १९१४ च्या महायुद्धानंतर तुर्कस्थानांत तरुण तुर्कांनीं जेव्हां तुर्की प्राजकच (Republic) स्थापन केलें तेव्हां त्याचे पहिले अध्यक्ष आणि सैन्याधीश जे केमालपाशा त्यांनीं शेवटच्या सुलतानाला आणि खलिफाला पदच्युत केलें आणि त्या संस्थांचेंहि अंतिम विसर्जन केलें. ती सविस्तर माहिती ह्या ग्रंथांतील वर उल्लेखिलेल्या "केमालपाशानें केलेलें

तुर्कस्थानांतील अरबी संस्कृतीचें अुच्चाटण" या नांवाच्या २ नि ३ लेखां-कांत जिज्ञासु वाचकांनीं अवश्य वाचावी.

त्याचप्रमाणें ह्या लेखाचें अंतरंग ज्यांना अधिक मर्मज्ञपणें समजून घ्यावयाचें असेल आणि मुसलमानांच्या धार्मिक नि सांस्कृतिक अंतःकलहाची नि यथावत् स्वरूपाची रूपरेखा अभ्यासावयाची असेल त्यांनीं आमच्या 'जात्युच्छेदक निबंध' या पुस्तकांतील "मुस्लीमांतील पंथोपपंथांचा परिचय" या लेखाचा पूर्वार्ध नि अुत्तरार्ध हे दोन्हीहि लेखांक अवश्य वाचावेत. ('जात्युच्छेदक निबंध' पृष्ठें १८६ ते २१९.)

---

— ८ —

## डॉ. आंबेडकरांना अुत्तर

फेब्रुवारी
सन १९३७ अिसवी

# विजयशील हिंदुराष्ट्र !

[ " हिंदूंचें जिणें हें आजच केवळ नव्हे तर सदासर्वदा अखंडित शरणागतीचें नि अेकसारख्या पराभवाचेंच होतें. हिंदु अजूनहि ज्या पद्धतीनें जगत आहेत ती प्रत्येक हिंदुमात्रास लाजिरवाणी आहे " असे आरोप डॉ. आंबेडकर यांनीं पंजाबच्या जातपात-तोडक-मंडळाच्या परिषदेंतील होअूं घातलेल्या त्यांच्या अध्यक्षीय भाषणांत केले होते. त्याला स्वा. वीर सावरकर यांनीं या लेखांत आपल्या साधार नि वक्तृत्वपूर्ण पद्धतीनें अुत्तर दिलें आहे.

—प्रकाशक ]

" There is not a petty state in Rajasthan that has not its Thermopylæ and scarcely a city that has not produced its Leonidas"

— Todd's Rajasthan.

कर्नल टॉडसारख्या परकीय अिंग्रजी लेखकानें राजपुतान्याविषयीं जें वरील वाक्यांत म्हटलें आहे कीं, तेथें ज्यांत अेकेक थर्मापिली नाहीं असें संस्थान नाहीं. अेकेक लिओनिडास निघाला नाहीं असें नगर नाहीं. तेंच या आसिंधुसिंधु विस्तारलेल्या अखिल हिंदुराष्ट्रासंबंधींहि म्हणतां येईल !

परंतु हे अैतिहासिक सत्य डोळ्यांआड करून हिंदुराष्ट्राचे शत्रूहि जें सहसा लावीत नाहींत तें दूषण डॉ. आंबेडकर आजकाल येतां-जातां हिंदुराष्ट्रास लावीत आहेत ! हिंदुराष्ट्राशीं त्यांना कोणताहि संबंध ठेवावासा वाटत नसेल तर तो त्यांनीं सुखेनैव तोडावा. आम्ही तो तोडूं अिच्छीत नाहीं; अुलटपक्षीं तो समतेच्या नि ममतेच्या रज्जूंनीं अधिक दृढ करण्यासाठीं

यथाशक्ति झटतहि आलों आहों; परंतु हिंदुराष्ट्रावर अुपकार करण्यासाठीं म्हणूनच काय तें कोणीं हिंदुत्वाच्या ध्वजाखालीं यावें अशी कोणाची पायधरणी करण्याअितकें कांहीं आजहि हें हिंदुराष्ट्र स्वाभिमानशून्य वा हतबल वा हताश झालेलें नाहीं! आणि तशी वेळ दुर्दैवानें कधीं आली तरीहि अशा बाजारबुणग्यांच्या औदार्यावर जगण्यापेक्षां हिंदुत्वाच्या सन्मानास्तव झुंजत मरणेंच कोणताहि मानधन हिंदु श्रेयस्कर मानील!

## आंबेडकरांचा आचरट आक्षेप!

" हिंदूंचें जिणें हें आजच केवळ नव्हे तर सदासर्वदा लाजिरवाणेंच काय तें होतें, हिंदु अजूनहि जे जगत आहेत ते कांहीं त्यांच्या पराक्रमानें नसून दुसऱ्याच्या पायांखालीं सदासर्वदा तुडविले जात असतांहि अशा जिण्याची लाजच त्यांना कधीं वाटली नाहीं म्हणूनच काय तें होय! कालाच्या ओघांत आम्ही जगतों आहोंत, अुरतों आहोंत, याचा हिंदुराष्ट्राला वाटणारा अभिमान पोकळ आहे. कारण हिंदुसमाजाचें जीवन हें सदासर्वदा दासाचें जीवन होतें, अखंडित शरणांगतीचें नि अेकसारख्या पराभवाचेंच काय तें!!—The Hindus' has been a life of a continuous defeat. It is a mode of survival of which every Hindu will feel ashamed!" अशा आशयाचे आणि अशा कठोर शब्दांचे आक्षेप डॉ. आंबेडकरांनीं पंजाबच्या जातपात-तोडक-मंडळाच्या परिषदेंत होअूं घातलेल्या त्यांच्या अेका अध्यक्षीय भाषणांत केलेले आहेत.

डॉ. आंबेडकरांचे वरील आक्षेप हे सर्वथैव खोटे आहेत. जर त्यांत सत्य असतें, तर तें कितीहि कटु असतें तरी आम्हीं त्याचा विषाद मानला नसता. डॉ. महाशयांनीं अस्पृश्यतेच्या आजच्या अत्यंत अन्यायी नि दुष्ट रूढीविषयीं जी निर्भर्त्सना केली आहे किंवा जन्मजात जातिभेदाच्या घातक परिणामाविषयीं जी जळजळीत टीका केली आहे तिच्या अितक्याच न्यायनिष्ठुरपणें आम्हीहि त्या दुष्ट रूढींना निषेधीत आलेले आहों, त्यांच्या अुच्चाटनार्थ झटत आलेले आहों. आमच्या हिंदुराष्ट्राच्या अंगीं आज मुरलेल्या त्यासारख्या अितर अनेक दोषांनाहि आम्ही सडेतोडपणें राष्ट्रहितार्थच आविष्कारण्यास कचरत नाहीं, हें आम्हीं सांगितलेंच पाहिजे असें नाहीं.

आपल्या राष्ट्रीय दोषांना धिक्कारण्याचें साहस आणि प्रतिकारण्याची शक्ति ज्या राष्ट्रांत अुरलेली नसते तें राष्ट्र मृत्युपंथास लागलेंच म्हणून समजावें; परंतु तसें साहस नि ती शक्ति आमच्या हिंदुराष्ट्रांत आजहि आहे असा आम्हांस पूर्ण भरंवसा असल्यामुळेंच आम्ही आमचे दोष अुघडकीस आणण्यास भीत नाहीं. तेव्हां आमच्या राष्ट्राचे असलेले दोष कोणी काढले तर तेवढ्या-साठीं केवळ भावना दुखते म्हणून आम्ही त्यास निषेधूं लागतों असें आमच्याविषयीं तरी कोणासहि म्हणतां येणार नाहीं. अर्थात् डॉ. आंबेडकर जें वरील आक्षेपांत म्हणतात कीं, हिंदूंचा अितिहास हा अखंड शरणा-गतीचाच अितिहास, हिंदूंचें जीवन म्हणजे प्रथमपासून आजपावेतों दास्याचेंच जीवन, The Hindus' has been a life of continuous defeat— तें जर अैतिहासिक सत्य असतें तर तो लज्जास्पद आक्षेपहि आम्हीं नाकारला नसता.

## पण तरीहि खऱ्या मानधन पुरुषाचें कर्तव्य

ह्या परिस्थितींतहि काय ठरतें? ज्या हिंदु राष्ट्रांत, हिंदु वंशांत, आपण जन्मलों नि वाढलों त्या आपल्या राष्ट्राचा मागचा अितिहास असा अखंड शरणागतीचा आहे, आपल्या वाडवडिलांनीं पराक्रम असा केलेलाच नाहीं, मानधन पुरुष असा आपल्या वंशांत कोणी आढळतच नाहीं, असें ध्यानांत येतांच ज्यांच्या उदरीं जन्मलों त्यांनाच लाथाडून, तशा दुर्गतींत पचणाऱ्या स्वतःच्या वाडवडिलांच्या पोटीं आम्ही जन्मलोंच नाहीं, स्वतःच्या वडिलांना वडील म्हणण्याची आम्हांस लाज वाटते असें कापुरुषी रडगाणें गात दुसऱ्याचे वडिलासच वडील म्हणण्यासाठीं हपापणें हें का आपल्या पिढीचें कर्तव्य ठरतें? ‘ जो बापासि बाप न म्हणे ’ असा तो कुपुत्र त्या आपल्या नामर्द पूर्वजांहूनहि नामर्द ठरतो! आपल्या झाडून साऱ्या पूर्वजांच्या ‘ अखंड शरणागती ’ चा कलंक दिसण्याअितका आणि तो मनांत सलण्याअितका जो स्वतःस मानधन मानतो त्या पुत्राचें कर्तव्य आपल्या बापास बाप म्हणण्याचें सोडून दुसऱ्याचा बाप दत्तक घेणें हें नव्हे! तर स्वतःच्या पराक्रमानें आपल्या वंशाला लागलेला तो अखंड शरणागतीचा कलंक धुअून टाकीन ही प्रतिज्ञा करून कर्तव्यरणांत उतरणें हेंच होय! जर माझे पूर्वज दुर्गतींत

पिचत असतील तर मी आपल्या पुरुषार्थानें त्यांस उद्धारीन; माझ्या वंशांत मागें कोणीं पराक्रम केलेला नसेल नि त्याची लाज मला वाटत असेल तर मीच त्या माझ्या वंशांतील पहिला पराक्रमी पुरुष होऊन त्या माझ्या पुसट वंशावळीला जगांतील अितिहासामध्यें सोनेरी अक्षरांत टळकपणें छापविणें माझ्या कुलशत्रूंनाहि भाग पाडीन; माझ्या पूर्वजांनीं कोणाचाहि पराभव केला नाहीं म्हणून हंसणाऱ्यांचे दांत माझ्यासारख्या पराक्रमी पुरुषाला जन्म देण्याअितका त्यांचा जो बीजभूत पराक्रम होता तो दाखवून त्यांच्याच घशांत घालीन; तितकेंहि न साधलें तरी निदान माझ्या आअीच्या घरांत चूल वा पंती पेटविण्याअितकी देखील चेतना नसल्यामुळें अंधेरच अंधेर पसरलेला आहे ह्यासाठीं तिला त्याच भुकेंत नि अंधारांत खितपत सोडून त्या तिच्या दुर्गतीच्या विटंबनेनेंच तिच्या शत्रूंची हांजी हांजी करीत, त्यांच्या घरच्या तुकड्यांवर पोट भरीत, त्यांच्या दिव्यांच्या दिवट्या पाजळीत राहाणारा त्या आअीच्या पोटीं आलेला जंत न होतां तिच्या त्या निराश नि निरभ्र दुर्दशेचा अंधकार घालविण्यासाठीं

## आपल्या हृदयाचीच आगकाडी पेटवून

निदान माझ्यापुरती तरी जी कांहीं चेतना, प्रकाश नि अूब तिला देतां येअील ती माझ्या आअीला देअीन, असाच निश्चय नि प्रयत्न स्वतःस मनुष्य म्हणविणाऱ्यानें केला पाहिजे !

जर खरोखरीच Hindus' Life has been a life of continuous defeat, जर हिंदु राष्ट्राचें जीवन हें अेक अखंड नि संतत पराभावाचेंच जीवन असतें तर आम्हीं तेंहि सत्य न लपवितां किंवा ह्या योगानें हताश न होतां हिंदूंच्या ह्या नि पुढच्या पिढ्यांना असेंच अुत्साहिलें असतें कीं, चला, आतां आपल्या पराक्रमानें त्या 'अखंड पराभवाचें' अुट्टें काढून आपल्या राष्ट्राचा तो कलंक धुअून टाकण्यासाठीं यापुढें तरी 'हतो वा प्राप्स्यसि स्वर्गं जित्वा वा भोक्ष्यसे महीम्' हा महाभारतीय मार्गच अनुसरूं या !

यावरून हें स्पष्ट होअील कीं, आम्ही आंबेडकरांनीं वारंवार केलेल्या वरील विधानांना जे निषेधूं अिच्छितो तें कांहीं तीं कडवट आहेत किंवा आमच्या

ाष्ट्राच्या त्यांत केलेल्या निंदेनें आमच्या भावना दुखावतात वास्तवच काय तें ाहे; तर तीं त्यांचीं विधानें मुळांतच अगदीं खोटीं नि खोडसाळ आहेत हणूनच काय तें होय. डॉ. आंबेडकरांसारख्या विद्वानाला, हिंदुधर्म-ीतीवर, श्रुतिस्मृतींवर, संस्कृतीवर अनेक व्याख्यानें नि प्रवचनें देत रहाणाऱ्या ाणि ग्रंथ लिहिणाऱ्या अेका अुत्तरदायी (Responsible) पुरुषाला त्यांचीं ीं विधानें कशीं सर्वथैव मिथ्या आहेत हें कळण्याअितकें हिंदु अितिहासाचें ानहि असलेंच पाहिजे - निदान असावयास पाहिजे. तसें असतांहि त्यांनीं या अर्थी तापट अविवेकाचे भरीं भरून हिंदुराष्ट्राचे नांवास हें नसतें लांछन अेतक्या अमर्यादपणें लावलें आहे त्या अर्थी आम्हांस त्यांचीं तीं विधानें ुसतीं खोटींच नसून खोडसाळहि आहेत, असेंच म्हणणें भाग आहे.

आपल्या पूर्वजांच्या ममतेपायीं त्यांची नसती स्तुति करीत सुटणें हें मूर्ख-णाचें असलें तरी माणुसकीस काहीं अगदींच सोडून नसतें; पण आपल्या ूर्वजांची नसती निंदा करणें किंवा ती कुणीं कुत्सितानें जाणूनबुजून ोंडावर केली असतां तिचा तीव्र प्रतिवाद न करता अैकून घेणें हे माणुस-ीस लांछनास्पद आहे. हिंदुत्वाचा संबंध, हिंदुराष्ट्राचें नातें, डॉ. आंबेड-रांनीं तोडलें असलें तरीहि

## केवळ न्यायाच्या, अैतिहासिक सत्याच्या आणि निःपक्षपाताच्या दृष्टीनें तरी

हिंदुराष्ट्राविषयीं त्यांनीं असलीं अगदीं खोटीं नि खोडसाळ विधानें वारंवार रीत रहावयास नको होतें. अशा भरमसाट निंदेनें हिंदुराष्ट्राच्या सत्कीर्ती-क्षां निंदकाच्या सत्कीर्तीसच जास्त बट्टा लागतो हें डॉ. आंबेडकरांनीं िसरू नये. तथापि तें विसरून जर कोणी अशी कुत्सित नि असत्य विधानें ारंवार करीत राहिला आणि जर त्यांचा वेळोवेळीं साधार प्रतिवाद करीत लें नाहीं तर अनेकदां अैकतां अैकतां असें असत्यहि सहस्रावधि सामान्य नि अतज्ज्ञ लोकांना सत्यासारखें वाटूं लागून राष्ट्राच्या आत्मविश्वासालाच क्का पोंचण्याचा अुत्कट संभव असतो, हेंहि कांहीं खोटें नाहीं. यास्तव ह्या ासत्य विधानांचा निषेध करणें आणि अैतिहासिक कसोटीस लावून त्यांचा

खोटेपणा अुघडकीस आणणें हें आम्ही आमचें कर्तव्य समजतों. सत्य काय तें जाणण्यासाठीं तरी डॉ. आंबेडकरांनीं ह्या अैतिहासिक कसोटीचा नीट विचार करावा.

ह्या अैतिहासिक छाननींत कोणच्याहि लहानसहान किंवा विवादास्पद घटनांवर अवलंबून न रहातां परकीय अितिहासकारांनाहि नाकारतांच येअूं नयेत अशा ज्या अखंडनीय नि अगदीं ठळक तेवढ्याच घटनांचा पुरावा आम्ही जमेस धरूं.

ज्या अर्थी डॉ. आंबेडकरांनीं त्यांच्या वर अुल्लेखिलेल्या लेखांत हिंदुराष्ट्राच्या कोणच्याहि अेका जातीला, प्रांताला, वर्गाला किंवा कालखंडाला लावून आपलीं विधानें न करतां तीं अेकंदर हिंदुराष्ट्राला नि त्याच्या अेकंदर जीवनकालास स्पष्टपणें अुद्देशूनच केलेलीं आहेत, The Hindus' life has been a life of continuous defeat असेंच ज्या अर्थी ते बेधडकपणें म्हणत आहेत त्या अर्थी त्यांचें खंडन करावयास ह्या विषयापुरतें तरी हिंदुराष्ट्राच्या अेकंदर अितिहासाचेंच विहंगावलोकन करणें अवश्य आहे.

* * *

## ( १ ) वैदिक नि पौराणिक कालखंड

जें राष्ट्र आज ह्या आसिंधुसिंधु भारतवर्षाला व्यापून हिंदु म्हणून निवसत आहे त्याचा मूळारंभ वैदिक काळांतील सप्तसिंधु ह्या नांवानें प्रख्यातलेल्या राष्ट्रापासून झाला. त्या आमच्या अत्यंत प्राचीन सप्तसिंधु ह्या संस्कृत अभिधेचेंच हिंदु हें प्राकृत रूप होय. वैदिक काळांतील त्या सप्तसिंधु राष्ट्रांतील वीरांचें खड्ग नि द्रष्टयांची स्फूर्ति ते ज्या प्रज्वलित यज्ञाग्नीस आधारीत असत त्याच्या ज्वालांसारखीच कशी दैदीप्यमान नि दुर्धर्ष होती, त्यांच्या काळांतील त्यांच्या शत्रूंवर विजयामागून विजय मिळवीत त्यांचीं सैन्यें, राज्यें नि संस्कृति, सरस्वतीपासून ब्रह्मावर्तास, ब्रह्मावर्तांतून मगधास, प्रयागास व काशीस, मथुरेस, द्वारकेस–पूर्व समुद्रापासून तों पश्चिम समुद्रापर्यंत अप्रास्थितपणें कशीं विस्तारत गेलीं; विंध्य ओलांडून, सह्य ओलांडून अंतीं दक्षिण समुद्र ह्यांनीं कसा गांठला; अनादि घनदाट महाअरण्यें कापून-छाटून प्रदेशाचे प्रदेश त्यांनीं

कसे वसविले, नांगरले, पेरले, सहस्रावधि नगरें आणि महानगरें कशीं अुभारलीं, वाटेंत भेटलीं तीं तीं विभिन्न जानपदें नि विपक्षीय संस्कृति कांहीं सामावून घेतल्या, कांहीं पचवून टाकल्या, कांहीं कशा मातीस मिळविल्या, कित्येक रावणांचीं दाही दाही शिरें कशीं छाटून टाकलीं, कित्येक द्वेष्टयांचे सहस्र सहस्र बाहू कसे तोडून टाकले, कित्येक बळी–महाबळींना कसें पाताळीं घातलें, काव्यशास्त्र, व्याकरण, कृति, शिल्प, धर्मप्रयोग, तत्त्वज्ञान प्रभृति भौतिक नि आत्मिक प्रगतींतहि केवढें महनीय स्थान त्यांनीं पटकाविलें तें कांहीं आतां नव्यानें सांगावयास हवें किंवा पुराव्यानें सिद्धावयास पाहिजे असें नाहीं ! डॉ. आंबेडकर स्वतःच त्या निबंधांत म्हणतात कीं, ‘That the Hindu Religion was once a missionary religion must be admitted. It would not have spread over the face of India if it was not a missionary religion !’ ‘हिंदुधर्म हा प्रचारशील धर्म होता ह्यांत शंकाच नाहीं. नाहीं तर ह्या साऱ्या भारतवर्षास तो असा व्यापून टाकूं शकताच ना !’ हिंदुराष्ट्राच्या धार्मिक दिग्विजयांसंबंधीं डॉ. आंबेडकरांनींच जें वरील अेकमेव प्रमाण पर्याप्त मानलें आहे तेंच वैदिक नि पौराणिक कालखंडांतील सांस्कृतिक नि राजकीय दिग्विजयांसंबंधींहि निर्णायक धरलें पाहिजे. वैदिक सप्तसिंधूचें राष्ट्र पंचनदापासून ब्रह्मावर्तांत, ब्रह्मावर्तांतून आर्यावर्तांत नि आर्यावर्तांतून ह्या “अुत्तरं स्यात्समुद्रस्य हिमाद्रेश्चैव दक्षिणम्। तं वर्षं भारतं नाम भारती यत्र संततिः” अशा अुभ्या भारतवर्षांत आपली संस्कृति नि साम्राज्य फैलावीत जात जात ज्याचा पुरोहित आणि सेनानी अिंद्र आहे अशा आपल्या राष्ट्राचें वर्चस्व ज्या काळच्या जगांत अप्रस्थितपणें गाजवीत राहिलें होतें त्या काळाविषयीं तरी Hindus’ life has ever been a life of continuous defeat असें म्हणण्याची कोणाची छाती आहे ! त्या हिंदूंच्या दिग्विजयी वैदिक, रामायणिक, महाभारतीय काळाचें वर्णन करावयाचें असेल तर असेंच केलें पाहिजे कीं, “In the vedic and puratanic period the life of the Hindus had ever been a life of one continuous triumph, of invincible. independence, astonishing progress and unchallengable superiority !”

आणि तो वैदिक नि पौराणिक कालखंडहि कांहीं लहानसहान नव्हता; शतकांनीं न मोजतां सहस्रांनीं मोजला जावा अितका सुदीर्घ! त्या कालखंडांतील **अिजिप्शिअन, बाबिलोनिअन, खाल्डिअन, असीरियन प्रभृति हिंदूंच्या त्या काळचीं समकालीन राष्ट्रें आपलें सारें जीवन-कार्य नि जीवन संपवून, मरून, अस्थिशेष वा अिष्टिकाशेष वा नामशेषहि होअून गेलीं!**

* * *

## ( २ ) अैतिहासिक काल: प्राचीन खंड

ग्रीकांची स्वारी आणि शेवटीं हिंदूंनीं त्यांची अुडवलेली धूळधाण— अितिहासकालाचे प्रारंभींच शिकंदरानें अि. स. पू. ३२६ वे वर्षी हिंदुस्थानवर स्वारी केली. वैदिक नि पौराणिक काळांतील दैत्यदानव, असुरनाग, यक्षराक्षसादि परकीय शत्रूंशीं दोन हात करून हिंदूंनीं त्यांचा धुव्वा अुडवून दिला आणि त्या कित्येकांच्या बारशाप्रमाणेंच सर्वांच्या बाराव्यालाहि जेवून ते मोकळे झाले! त्यानंतरचा काळ तो अितिहासकाळ. त्याच्या आरंभींच सर्व पृथ्वी पादाक्रान्त करूं निघालेल्या ग्रीकांसारख्या बलाढ्य शत्रूंशीं सामना देण्याचा प्रसंग ह्या शिकंदराच्या स्वारीमुळें त्यांना आला.

पण ग्रीस देशांतून निघाल्यानंतर सीरिया, अिराणप्रभृति देशविदेश पादाक्रांत करीत आलेल्या शिकंदराच्या दिग्विजयाची लाट ह्या हिंदुस्थानच्या हिमालयीन तटावर आदळतांच फुटून गेली आणि भारतविजेता म्हणवून घेण्याची शिकंदराची खुमखुम तर पंचनद ओलांडतो न ओलांडतो तोंच जिरून गेली! त्यानें पौरसाचा पराभव केला, पण तो अितक्या निकराच्या लढाअीनंतरच कीं ग्रीक सैन्याचें त्यापुढच्या साम्राज्याशीं गांठ घालण्याचें धैर्यच कांहीं अंशीं तरी खचून जावें! व्यासनदी ओलांडून त्या मगध साम्राज्याशीं गांठ घालण्याचें शिकंदराच्या सैन्यानें साफ नाकारलें, बंड केलें आणि शिकंदराला परत फिरणें भाग पाडलें. ह्या बंडास अितरहि कांहीं कारणें असलीं तरी जर का मगध साम्राज्यामध्यें शिकंदरास अिराणप्रमाणेंच मोकळें रान सांपडण्याचा संभव असता नि चालतां चालतां जिंकतां येण्याअितकें दुर्बल आहेसें त्या ग्रीक सैन्यास वाटलें असतें तर ते मगधाच्या राजवाड्यांत दोनचार चम-

